# नवभारत

एप्रिल-२०१४

- निरंतरतेतला स्वातंत्र्याचा नित्यनूतन संकल्प
- 'मानववादाची विविध परिमाणे' :-
  प्रकरण तिसरे 'धार्मिक मानववाद'
- स्वतंत्र विदर्भ राज्याच्या चळवळीस जनतेचा प्रतिसाद
- ग्रंथवेध : एका इतिहास-पंडिताची हकिकत

मे-जूनचा जोड अंक पं. नेहरू विशेषांक म्हणून प्रसिद्ध होईल.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

राज्य मराठी विकास संस्थद्वारे
संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६१ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदान-प्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित-वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता' पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयातील ग्रंथालयात अद्ययावत् पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयातून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांना आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

# लेखकांस आवाहन

नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारताकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.

४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही हे यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

- संपादक मंडळ

अनुक्रमणिका





प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६७। अंक ७। एप्रिल २०१४
चैत्र/वैशाख शके १९३६
वार्षिक वर्गणी ३०० रुपये
या अंकाची किंमत रु. २०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
नीता गायकवाड
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)



अनुक्रमणिका








# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६१ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळयांपुढे ठेवले होते. ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदान-प्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित-वाङ्मय यांना जी कालानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता' पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयातील ग्रंथालयात अद्ययावत् पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयातून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांना आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रू. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

# लेखकांस आवाहन

नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारताकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.

४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही हे यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

- संपादक मंडळ









प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६७। अंक ७। एप्रिल २०१४
चैत्र/वैशाख शके १९३६
वार्षिक वर्गणी ३०० रुपये
या अंकाची किंमत रु. २०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
नीता गायकवाड
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)



अनुक्रमणिका








# नवभारत

## एप्रिल २०१४

## अनुक्रमणिका

# निरंतरतेतला स्वातंत्र्याचा नित्यनूतन संकल्प

बाबूराव चंदावार

**प्रस्तावना :**

राजकीय स्वातंत्र्य प्राप्त केल्यानंतर भारताची राज्यघटना अस्तित्वात आणली गेली. या राज्यघटनेतूनच भारताची संसदीय राजकीय व्यवस्था अस्तित्वात येऊ शकलेली आहे. अर्थात, ही व्यवस्था संसदीय लोकशाहीचे अस्तित्व अबाधित करण्याच्या दृष्टीने आश्वासक राहिलेली असावी, असे सध्यातरी म्हणता येण्यासारखी परिस्थिती दिसत नाही. म्हणून, ही परिस्थिती संतोषजनक आहे, असे म्हणता येत नाही! अर्थात, प्रत्येक व्यवस्थेत काही ना काही अंतर्विरोध (इनर कान्ट्रॅडिक्शन्स्) मुळात असतातच. हे अंतर्विरोध संसदीय लोकशाहीत असणे स्वाभाविकच म्हणता येईल! पण, जेव्हा अंतर्विरोध धडका देत उफाळून वर येताना दिसतात तेव्हा त्यामुळे संसदीय लोकशाहीची व्यवस्था कोलमडून पडू नये, याची काळजी मात्र घ्यावीच लागते. जर ती काळजी घेतली जात नसेल, तर अर्थातच ही लोकशाहीची व्यवस्था टिकवून धरणे शक्य होत नाही! असेच काहीसे भारताच्या संसदीय लोकशाहीच्या बाबतीत होत आहे किंवा काय, यावर विचार करायला हवा. पण, या बाबतीत सध्याच्या परिस्थितीत सर्वत्रच उपेक्षेचा भाव दिसून येतो आहे. कारण, संसदीय लोकशाहीच्या भवितव्याबाबतीत जे आश्वासक राजकारण असावयाला हवे असते, तेच मुळात अस्तित्वात नसल्याची सध्याची राजकीय परिस्थिती झालेली असावी, असे साधार म्हणता येऊ शकते. अर्थात, या दृष्टीने सध्याच्या राजकारणाचे व त्या अनुषंगानेच संसदीय लोकशाहीचे स्वरूप लक्षात घ्यायला हवे. हे स्वरूप लक्षात घेताना संसदीय लोकशाही जर अगदीच विद्रूप झालेली दिसत असेल, तर त्याच्या संभाव्य परिणामांचाही विचार करायला हवा!

**१ : राज्यघटना कोणत्या प्रेरणेतून?**

राजकीय स्वातंत्र्य प्राप्त होण्याच्या आधी ज्या स्वातंत्र्याच्या चळवळी भारतात होऊ शकल्या होत्या, त्या सर्वच चळवळीचे महत्त्व मान्य करायला हवे व ते मान्य केले गेलेही आहे! पण, स्वातंत्र्यप्राप्तीच्या दृष्टीनेच ज्या श्रेयस्कर चळवळी झाल्या होत्या, त्यांचा स्वतंत्र संदर्भ आहे. म्हणून या संदर्भाची योग्य ती जाण ठेवायला हवीच! पण, ही जाण ठेवण्याच्या दृष्टीने जी मतमतांतरे होती, ती स्वतःकडे श्रेय घेण्याच्या हेतूनेच जेव्हा प्रेरित झालेली दिसतात, तेव्हा त्यातून एक तऱ्हेची भ्रामक अवस्था निर्माण होत असते. ही भ्रामक अवस्था पाण्यात बुडबुडे येतात त्या तऱ्हेचीच सर्वसामान्यपणे असल्याचे दिसते. ते ज्या एका पद्धतीने विरून जातात, त्याच पद्धतीने भ्रामक अवस्थाही विरून जात असते. पण, भ्रामक ठरलेल्या बुडबुड्यांना गोंजारत राहण्याची एक मानसिकता अस्तित्वात येत असते व ही मानसिकता हिंसक चळवळींच्या बाबतीत ठळकपणे आढळून आली होती व अद्याप आढळून येते आहे! म्हणून, स्वातंत्र्याच्या चळवळीला महात्मा गांधींच्या नेतृत्वाने जे स्वरूप प्राप्त झाले होते, तेच या मानसिकतेतून नाकारण्याची मनोवृत्ती स्वातंत्र्यपूर्व काळात जशी काही थोड्यांच्या बाबतीत आढळून आली होती, त्याचीच निर्जीव आवृत्ती या वेळीही हिंसेचेच समर्थन करणाऱ्यांच्या बाबतीतही प्रचलित असलेली दिसून येते आहे. पण, हे असे होतच राहणार! कारण भ्रामक अवस्थेतून सहजपणे बाहेर पडणे सहसा शक्य होत नसते. या दृष्टीने विचार करताना संसदीय लोकशाहीची व्यवस्था ज्या समजुतीतून निर्माण केली गेली किंवा निर्माण झाली, ती समजूत मुळात स्वातंत्र्याच्या संकल्पाची जाणीव बाळगणारी होती किंवा काय, असा एक प्रश्न निर्माण केला जाऊ शकतो. कारण, या प्रश्नाच्या अनुषंगानेच जेव्हा विचार केला जातो किंवा विचार केला जाईल, तेव्हा लक्षात येते, की या दृष्टीने म्हणावे तसे किंवा तेवढे, पुरेसे मानले जाऊ शकेल असे भान ठेवले गेलेच असेल याची काहीएक खात्री देता येण्यासारखे नाही व नसेलच! अर्थात, स्वातंत्र्यपूर्व

काळात स्वातंत्र्याच्या मानूनच ज्या चळवळी केल्या गेल्या होत्या, त्या सर्वांची वेगवेगळी व स्वतंत्र प्रकृती होती, जी एकमेकांना छेद देणारी प्रकृती म्हणता येऊ शकेल! तेव्हा भिन्न प्रकृती असलेल्या स्वातंत्र्याच्या चळवळी स्वातंत्र्याच्याच संकल्पनेच्या बाबतीत एकवाक्यता नसणाऱ्यांपैकीच असणे स्वाभाविक होते. म्हणून, भिन्न प्रकृतीच्या स्वातंत्र्याच्या अनेकानेक चळवळींपैकी त्यांतल्या कोणत्या एका संकल्पाच्या आकर्षणातून भारतीय राज्यघटना घडविली गेली असावी, हे जर लक्षात घेणे शक्य होणारच असेल तर ते अवश्य लक्षात घ्यायलाच हवे! पण, हे लक्षात घेणे तसे शक्य होणारच नाही, असेही वाटत असते. कारण, भारतीय राज्यघटना घडवताना राजकीय स्वातंत्र्य प्राप्त झाल्यानंतर लगेच जी राज्यव्यवस्था अस्तित्वात आणणे गरजेचे वाटले होते, तेवढेच लक्षात घेऊन राज्यघटना घडवली गेली असावी, असेही वाटते. अर्थात, स्वातंत्र्याच्या संकल्पनेचे यथायोग्य आकलन करून घेऊनच राज्यघटना निर्माण केली जाणे शक्य झाले नसावे व नसणार! अर्थात, जगात अस्तित्वात असलेल्या अन्य अनेक राष्ट्रांच्या राज्यघटनांचा परामर्श घेऊन त्यांवर अवश्य विचार केला गेलाच असेल. पण, यातूनच कोणत्याही पण एकाच राज्यघटनेची निवड केली गेली, असेही प्रत्यक्षात घडलेले दिसत नाही हे उघडच आहे! अशाही स्थितीत स्वातंत्र्यात लोकशाहीची राज्यव्यवस्था निर्माण करता यावी या हेतूतलाच एक संकल्प राज्यघटना निर्माण करण्याचा होता, हे मात्र लक्षात घ्यायला हवे! कारण, राज्यघटना निर्माण करण्याचा कोणताही एक संकल्प बाळगल्याशिवाय यानुसार राज्यघटना घडविणे शक्य झालेच नसते, हे उघडच आहे. म्हणून, राज्यघटना घडविण्याचा नेमका संकल्प काय होता हे जाणून घेणे महत्त्वाचे ठरते. कारण, हे जाणून घेतल्यांनेच राज्यघटनेचे जे काही स्वरूप घडले आहे, ते ज्या एका प्रेरणेतले व कलातले म्हणता येईल त्याचा उलगडा होऊ शकतो व तो उलगडा व्हावयालाही हवाच!

**२ : गांधीजनांची हतबलता**

रशियात १९१७ साली घडून आलेल्या बोल्शेविक क्रांतीमुळे 'समाजवाद' हा शब्द आत्यंतिक प्रचलित झाला होता. कारण, बोल्शेविकांनी साम्यवादाचा (कम्युनिझम) पुरस्कार करूनच लेनिनच्या नेतृत्वाखाली क्रांतीची व्यूहरचना केली होती. पण, साम्यवादाचा पुरस्कार करून जी नवी समाजव्यवस्था अस्तित्वात आणण्याचा संकल्प यात गृहीत धरला गेला होता, त्याला समाजवादी समाजरचना म्हटले गेले व भांडवलशाहीला व तिच्या समर्थक-पुरस्कर्त्यांना वगळता जगात सर्वत्र याचे आकर्षण निर्माण झालेही होते. हेच आकर्षण भारतातही निर्माण होऊ शकले होते. पण, याचे पर्यवसान भारतीय राज्यघटना निर्माण करण्यात झाले, असे मात्र म्हणता येणार नाही. कारण भारतीय राज्यघटना समाजवादाच्या आकर्षणातली राहू शकलेली नाही व ती तशी असणे शक्यही नव्हते. पण, भारतीय राज्यघटनेला ज्याचे आकर्षण वाटले होते असे म्हटले जाऊ शकते, ते नेमके काय होते, हे मात्र फारसे स्पष्ट झालेले नव्हते. अशा या स्थितीत इंग्लंडच्या पार्लमेंटला ज्याला पार्लमेंटची 'जननी' म्हटले जात होते, त्याकडे भारतीय राज्यघटना घडवणाऱ्या घटनाकारांचा कल झाला असावा किंवा काय, याकडे डोळसपणे पहायला हवे आहे. कारण, पार्लमेंटची 'जननी' म्हटले गेलेले इंग्लंडचे पार्लमेंट लोकशाहीच्या राज्यव्यवस्थेतलेच मानले गेल्यामुळे व जगात याचीच मान्यता निर्माण झाल्यामुळे लोकशाहीतली राज्यव्यवस्था भारतात इंग्लंडच्या लोकशाहीच्या व्यवस्थेसारखीच ठेवण्याकडे भारताच्या राज्यघटनाकारांचा कल झाला होता, असे म्हटले जाऊ शकते. कारण, सकारण अथवा अकारण इंग्लंड लोकशाहीचा पुरस्कर्ताच असल्याचे मान्य करून भारतानेही लोकशाहीचाच पुरस्कार करावा, असे मानण्याकडेच बहुतेकांचा कल त्या वेळी झालेला होता. अर्थात, बोल्शेविक क्रांतीमधून जी राज्यव्यवस्था रशियात अस्तित्वात आली होती, ती लोकशाहीची नसून एकाधिकारशाहीची अथवा हुकूमशाहीचीच असल्यामुळे ती हुकूमशाही अमान्य करून जर लोकशाही स्वीकारायचीच असेल तर इंग्लंडच्या लोकशाहीला अन्य पर्यायच त्या वेळी जगात उपलब्ध नव्हता. किंवा भारताच्या स्वातंत्र्यातली इंग्लंड व रशियाची व्यवस्था वगळूनच स्वतंत्र राजकीय व्यवस्था अस्तित्वात आणायला हवी होती. पण, ही स्वतंत्र राजकीय व्यवस्था लगेचच निर्माण

अनुक्रमणिका

करणे शक्य होणार नव्हते व तसे झालेही नाही. म्हणून, इंग्लंडच्या लोकशाहीचेच अनुकरण करून तिलाच मिळतीजुळती राजकीय व्यवस्था स्वीकारावी लागली होती.

संविधानसभेचे मध्यप्रदेशातून निवडले गेलेले सदस्य (स्व.) आचार्य दादा धर्माधिकारी यांच्या म्हणण्यानुसार महात्मा गांधींनी अशा लोकशाहीच्या व्यवस्थेला अनुमती दिली होती म्हणतात. यावर दादांशी ते हयात असताना विशेष कारणास्तव माझी प्रत्यक्ष चर्चा झालीही होती. महात्मा गांधींनी जरी अनुमती दिली होती, तरी अर्थातच स्वातंत्र्याच्या संकल्पाला अनुसरून ते नव्हते! कारण, अशा अपेक्षित संकल्पाला अनुसरून राज्यव्यवस्था घडविण्याची मानसिकता भारतीय राज्यघटना समितीत निर्माण होऊ शकलेली नव्हती. पण, ही मानसिकता निर्माण व्हावी हे मात्र अपेक्षित होते. अर्थात, जे अपेक्षित होते ते घडू शकले नाही, हीच वस्तुस्थिती आहे. पण, यामुळे भारतीय राज्यघटना स्वातंत्र्य-चळवळीची उपेक्षा करणारी आहे असे जरी म्हटले गेले नसले, तरी त्याकडे दुर्लक्ष करूनच राज्यघटना घडवली गेली, एवढे मात्र म्हणायलाच हवे! पण, स्वराज्य प्राप्त झाल्यानंतर हेच घडणे शक्य होते, असेच मानले गेले आहे. कारण, भारतीय स्वातंत्र्य-चळवळीचा सर्वमान्य असा कोणताही एकच संकल्प स्पष्टपणे राज्यघटना निर्माण करणाऱ्यांच्या दृष्टीसमोर येऊच शकला नव्हता. हीच जर वस्तुस्थिती मानली, तर भारताची राज्यघटना स्वातंत्र्य-चळवळीच्या कोणत्याही पण एकाच संकल्पाशी निगडित ठेवता आली नाही, एवढे मात्र स्पष्ट झालेच आहे. पण, महात्मा गांधींच्या नेतृत्वाने झालेल्या स्वातंत्र्याच्या अंतिम चळवळीत ज्याला महात्मा गांधींनी सत्याग्रहाचे अधिष्ठान निर्माण करून दिले होते, त्याचे शेवटी काय झाले, असा प्रश्न मात्र उपस्थित झाला होता व तो आजवर शिल्लक उरलेलाही आहे. (स्व) आचार्य धर्माधिकारी यांच्याशी माझा यावर प्रत्यक्षात संवाद झाला होता. पण, भारतीय राज्यघटनेत महात्मा गांधींच्या स्वातंत्र्यविषयक संकल्पांना स्थान मिळू शकले नाही, या माझ्या प्रतिपादनाला दादा धर्माधिकारी यांनी मूकसंमती दिलीही होती! तेव्हा, स्वातंत्र्यात राज्यघटना घडवताना गांधीजनांची जी हतबलता आढळून आली होती, तेच दादांशी माझ्या झालेल्या संवादातून स्पष्ट झाले होते. पण, आचार्य धर्माधिकाऱ्यांनी स्वतःचा किंवा गांधीजनांचा केविलवाणा वाटू शकेल असा कोणताही बचाव मात्र केला नव्हता! कारण, महात्मा गांधींची अनुमती घेऊनच भारताची राज्यघटना घडवली गेली, याचे प्रतिपादन करूनच त्यांनी यावर स्वतः दृढ असल्याचे दर्शविले होते.

### ३ : स्वातंत्र्याच्या चळवळीतला स्वातंत्र्याचा संकल्प

भारतीय राज्यघटना घडवताना गांधीजन अगतिक झालेच होते. पण, या अगतिकतेची जी काही कारणे म्हटली जाऊ शकतील त्यांचे आकलनही करून घ्यायला हवे! कारण, महात्मा गांधींनी भारतीय स्वातंत्र्य हे ग्रामीण भारतातचेच स्वातंत्र्य असावयाला हवे असेच म्हटले होते व याला अनुसरूनच त्यांनी खेड्यांचे स्वराज्य वा 'ग्रामस्वराज्य' या शब्दाचा वापरही केला होता. अर्थातच हे मागे पडले. ते इतके मागे पडले, की यातून ग्रामीण भारत स्वातंत्र्याच्या लाभापासून वंचित होऊन कसाबसा अगतिकपणे जगतो आहे, असाच एक निष्कर्ष काढला जातो आहे! तेव्हा महात्मा गांधींनी स्वातंत्र्याच्या चळवळीचा ज्या उद्देशाने पुरस्कार केला होता, त्याच्याशी भारताची राज्यघटना सुसंगत राहू शकलेली नाही व यातून ग्रामीण भारताच्या संदर्भात जे प्रश्न या वेळी आ वासून उपस्थित झालेले दिसत आहेत, ते सर्वच प्रश्न भारताच्या स्वातंत्र्याच्यावरच प्रश्नचिन्ह उभे करणारे जर झालेले असतील, तर यावर कसा विचार करायला हवा याची एक काहीतरी दिशा निश्चित करायला हवी! कारण, महात्मा गांधींना जे भारताचे स्वातंत्र्य अपेक्षित होते तेच जर साकारले नसेल किंवा भविष्यात साकारले जाणार नसेल, तर याचे काय परिणाम होऊ शकतील, हे अर्थातच जाणून घ्यायला हवे आहे. कारण, ग्रामीण भारतात व एकूणच भारतीय लोकजीवनात जे प्रश्न स्फोटक होताना दिसत आहेत, ते तसेच सुयोग्य परिणामकारी उत्तराविना पडून राहणार असतील, तर यातूनच राजकीय व्यवस्थेच्या नव्या पर्यायाचा शोध घेतला जाऊ शकेल व हा पर्याय

भारतीय राज्यघटनेचा नुसताच अवमान करील असे नसून मुळात राज्यघटनाच नाकारणारेही ते मानले जाऊ शकेल! अर्थात, याची कल्पना करायला हवी. कारण पर्यायाचा शोध घेताना जी काही नवी राजकीय व्यवस्था अस्तित्वात यावी, तिचा आग्रह धरणाऱ्या चळवळींचा प्रादुर्भावही या देशात होऊ शकलेला आहे, हे लक्षात घ्यायला हवे. याची परिणामकारकता ज्या एका क्षमतेची असू शकेल किंवा असण्याची शक्यता मानली जाऊ शकेल, ती कोणत्या चारित्र्याची (कॅरेक्टर) असू शकेल, हेदेखील जाणून घ्यायला हवे. म्हणून, स्वातंत्र्याच्या भूमिकेच्या आस्थेतल्या विस्फोटक चळवळी यशस्वी होतील किंवा होणारही नाहीत असेच जरी गृहीत धरले, तरी राजकीय स्वातंत्र्यालाच अस्थिर करण्याच्या घटना होतच राहतील किंवा काही प्रमाणात त्या सध्या होतही आहेत. त्यांना कसे आवरायचे व भारतीय राज्यघटनेतूनच अस्तित्वात आलेल्या लोकशाहीच्या शासनाला ते कसे व कितपत झेपू शकेल, असाही एक प्रश्न उपस्थित होऊ शकतो. किंबहुना तो प्रश्न उपस्थित झालाच आहे, असेच म्हणता येण्यासारखी सध्याची परिस्थिती झालेली दिसते आहे! म्हणून, स्वातंत्र्याच्या चळवळीतल्या संकल्पाशी प्रामाणिक राहूनच सध्याची राज्यघटना राबवली जाऊ शकेल असा ज्यांना विश्वास वाटतो, त्यांनी भारताच्या राज्यघटनेत कशा प्रकारचे व कोणते मूलभूत बदल घडवून आणायला हवेत, याची उपाययोजना करण्यास प्रवृत्त व्हावयाला हवे असे म्हटले जाईल. पण, भारतीय राज्यघटना या दृष्टीने उपयोगी असणार नसेल तर पुढे काय करायचे, याचाही निर्णय करून घ्यायला हवा! कारण, सध्याची राज्यघटनाच अमान्य करून स्वातंत्र्याच्या संकल्पाला अनुसरून किंवा स्वातंत्र्याच्या भूमिकेला स्वीकारून नवी राज्यघटना निर्माण करण्याचा एक पर्याय असू शकतो व तो पुढे केला जात असताना सध्या दिसतेही आहे. पण, हा पर्याय पुढे करणारे अनत्याचारी मार्गानेच याचा अवलंब केला जावा हेच मान्य करणाऱ्यांपैकी आहेत, व यासाठी लोकमत निर्माण करूनच त्याच्या बळावर व प्रभावातून नवी राज्यघटना घडवावी या निर्णयाप्रत ते जाऊही शकतात! अर्थात काही प्रमाणात ते या निर्णयाप्रत गेलेलेही आहेत, हे लक्षात घ्यायला हवे. पण, अनत्याचारी मार्ग ज्यांना मान्यच होत नाहीत व जे सशस्त्र क्रांतीच्या मार्गानेच जाऊ इच्छितात त्यांनी माओवादाच्या पुरस्कारातून ज्या हालचाली सध्या सुरू ठेवल्या आहेत, त्या जरी कमी प्रभावी मानल्या तरी त्या केव्हातरी प्रभावी ठरू शकतात, हे गृहीत धरूनच त्यावर विचार करायला हवा. म्हणून सर्वप्रथम स्वातंत्र्याच्या चळवळीतून स्वातंत्र्याचा मानूनच जो संकल्प सोडला गेला होता म्हटले जाऊ शकेल, त्याविषयी व त्यातल्या भिन्न स्वरूपांविषयी जाणून घ्यायला हवे.

**४ : स्वातंत्र्याच्या भवितव्याचा नेमकेपणा**

भारतीय स्वातंत्र्यास्तव केल्या गेलेल्या अनेक चळवळी त्यांच्या भिन्न स्वरूपांत अस्तित्वात आल्या होत्या. भारतीयांनी त्या कशा व कितपत स्वीकारल्या, याचा एक इतिहास घडलेलाच आहे. यांचे भिन्न प्रवाह लक्षात घेता त्यांतल्या किती स्वातंत्र्याच्या भूमिकेशी प्रामाणिक होत्या व टिकाऊ ठरू शकल्या, याचाही इतिहास घडलेलाच आहे. तो लक्षात घेता स्वातंत्र्याच्या संकल्पाचा कसदारपणा ज्या चळवळींत होता व ज्या चळवळी निकृष्ट ठरल्यामुळे थांबल्या व नामशेष झाल्या, त्यांचा शोध घ्यायला हवा. कारण, तो शोध घेता येऊ शकतो. म्हणून तो जाणिवेत न सामावू शकणारा म्हणता येत नाही. या दृष्टीने ज्यांनी स्वातंत्र्याचा पुरस्कार केला व ज्या हेतूने तो पुरस्कार केला, त्याचा तपशील लक्षात घेऊनच निश्चित अशा निष्कर्षाप्रत जाता येऊ शकेल. याचे जागतिक पातळीवर जे प्रवाह होते व या प्रवाहांपासूनच प्रेरणा घेऊन या देशात स्वातंत्र्याच्या चळवळी करण्यास ज्यांना प्रवृत्त व्हावे लागले होते, ते प्रवाह नेमके किती व कोणत्या स्वरूपाचे होते, हे संक्षेपानेच जाणून घ्यायला हवे.

स्वातंत्र्यपूर्व काळात रशियाची बोल्शेविक क्रांती हा एक लेनिनच्या नेतृत्वातला स्वातंत्र्याच्या चळवळीला प्रेरणा देणारा प्रवाह होता. याच्याच विकसित व दृश्य परिणामातून चीनच्या क्रांतीचा माओप्रणीत नवा प्रवाह अस्तित्वात आला. दुसरा प्रवाह जर्मनीच्या हिटलरचा व इटालीच्या मुसोलिनीचा होता. भारतात ज्यांना याचे आकर्षण वाटले होते ते बहुतेक सर्व, विशेषतः हिन्दुत्वाला

मानणारे श्रेष्ठं वंशवादाचे पुरस्कर्तेच मानले जात होते. तिसरा प्रवाह – ज्याला विशुद्ध भारतीयच म्हटले जाऊ शकेल – फिरोजशाह मेहता, लोकमान्य टिळक व गोपाळ कृष्ण गोखले अशा महान देशभक्तांच्या नेतृत्वातला होता. अर्थात स्वातंत्र्य-चळवळीच्या अंतिम पर्वात ते नेतृत्व महात्मा गांधींकडे आले होते. याला चौथा व निर्णायक ठरलेला प्रमुख प्रवाह मानायला हवा. पण, स्वातंत्र्याच्या भूमिकेतला म्हणण्याऐवजी संसदीय लोकशाहीचा पुरस्कार करणाऱ्यांचाच ज्याला म्हणता येईल, असा एक प्रवाह युरोपातल्या किंवा इंग्लंड-फ्रान्समधल्या घडामोडींकडे आकर्षित झाला होता. पण, इंग्लंड-फ्रान्स-पोर्तुगाल या सर्वांमधल्या दर्यावर्दींनी निर्माण केलेल्या व्यापारी अभियानाला अनुसरून निर्माण झालेला हा प्रवाह म्हणायला हवा. या प्रवाहातून साम्राज्यवादी शोषणाला संधी उपलब्ध होऊ शकली व साम्राज्य-विस्तारासाठीच त्यांचे स्थैर्य भारतात निर्माण व्हावे, ही इच्छा-आकांक्षा बळावलीही गेली होती. यात फक्त इंग्लंडची ब्रिटिश राजवट स्थिरावू शकली. फ्रेंच व पोर्तुगीज स्थिरावू शकले नाहीत. ते अल्प काळातच मर्यादित झाले व त्यांचा उपनिवेशवाद संपुष्टात येऊन भारताला स्वातंत्र्य मिळताच ते भारतातून नामशेषही झाले. पण, राज्यव्यवस्थेतल्या आदर्शांची इंग्लंडची वैचारिकता मान्य करणारा वर्ग भारतात 'सिविल सोसायटी' या नावाने अस्तित्वात आला तो मात्र टिकून राहिला. 'ब्रिटिश साम्राज्यावर सूर्यास्त होत नसतो' या म्हणीत तो टिकवून धरण्याचा निष्फळ प्रयत्नही झालाच होता. तेव्हा, असे हे सर्व प्रवाह भारतीय स्वातंत्र्याच्या चळवळीच्या काळात भारतात अस्तित्वात आलेच होते. अर्थात यातूनच भारतीय स्वातंत्र्याच्या चळवळीला आकार मिळत गेला. यांतला रशिया-चीनचा प्रवाह लक्षात घ्यायला हवा. अर्थात, भारतीय स्वातंत्र्याच्या सत्याग्रही चळवळीचे नेतृत्व महात्मा गांधींकडे होते. त्याला मानणारा रशिया-चीनचा प्रवाह नव्हता. म्हणून, तो भारतात मूळ धरू शकला नव्हता. दुसरा प्रवाह हिटलर-मुसोलिनीच्या एकाधिकारशाहीचा व फॅसिझमचा पुरस्कार करणाऱ्यांचा होता. तो भारतीय स्वातंत्र्याच्या सत्याग्रही विचारसरणीला मान्यता देणार नव्हता. तो स्वातंत्र्यवीर विनायक दामोदर सावरकर यांच्या स्वातंत्र्यास्तव सशस्त्र उठाव करण्याच्या संकल्पनेचा पुरस्कार करणाऱ्यांचाच राहू शकला होता. याला भारतातल्या सरंजामदार वर्गाने व उच्चवर्णीयांनी मान्यता दिलेली होती. यातलीच एक शाखा नंतरच्या काळात राष्ट्रीय स्वयंसेवक संघ या नावाने अस्तित्वात आली. विदर्भातल्या मालगुजार-जमीनदार वर्गाच्या समर्थनातून व प्रोत्साहनातूनच ती अस्तित्वात आली होती! पण, याला राष्ट्रव्यापी मान्यता मिळण्याची शक्यता त्या वेळी तरी नव्हतीच. म्हणून, रा. स्व. संघाचे तत्त्वज्ञान हिन्दुराष्ट्रवादाचेच जरी मानले जाते, तरी विनायक दामोदर सावरकर यांच्यात जो स्वातंत्र्याच्या उग्र भावनेने प्रेरित झालेला पिळदारपणा दिसून येत होता, तसा तो रा. स्व. संघाच्या स्वातंत्र्याच्या भावनेतल्या पिळदारपणाचा नव्हता. तो फक्त हिन्दुराष्ट्रवादाच्या पुरस्कारापुरताच मर्यादित होता व अद्यापही तो तसाच राहिलेला आहे. म्हणून, स्वातंत्र्यप्राप्तीस्तव ब्रिटिश साम्राज्यावर परिणाम करू शकणारे कोणतेच गुण यांच्यापैकी कोणातच नव्हते व म्हणूनच ते स्वातंत्र्याच्या चळवळीत निर्णायक ठरलेल्या पर्वात सहभागी झाले नव्हते! ध्रुवीकरणाची प्रक्रिया चालत राहिल्यामुळे सध्या जी याची परिस्थिती निर्माण झाली आहे ती लक्षात घेता, यात भारतीय स्वातंत्र्याच्या भवितव्याच्या दृष्टीने नेमकेपणाने सांगता येऊ शकेल, असे काय असू शकेल व आहे, हे लक्षात घ्यायला हवे.

**५ : स्वातंत्र्याच्या चळवळीतल्या संकल्पाचा उरलेला प्रश्न**

भारताला आकस्मिकपणे स्वातंत्र्य मिळालेले नाही. भिन्न प्रवाहांच्या स्वातंत्र्याच्या चळवळीतूनच ते मिळाले आहे. पण, स्वातंत्र्याचा संकल्प म्हणून ज्याला ओळखता येऊ शकेल, तो संकल्प स्वातंत्र्याची चळवळ करू शकलेल्या कोणत्या अशा प्रवाहातून स्पष्ट होऊ शकलेला आहे, त्याची ओळख करून घ्यायला हवी. हे तसे अडचणीचेच आहे. तरीही स्वातंत्र्याचा संकल्प अशा अडचणीतूनही ओळखता यायला हवे आहे! कारण, स्वातंत्र्यात राज्यघटना घडून आल्यावर तिला अनुसरून जी राज्यव्यवस्था अस्तित्वात आणली गेली आहे, तिचे आजचे स्वरूप पाहता ती स्वातंत्र्याच्या भवितव्याला आश्वासक आहे किंवा काय, याचा उलगडा करून

घ्यायला हवा. कारण, स्वातंत्र्याच्या चळवळीतून लक्षात आलेल्या संकल्पांशी या राज्यव्यवस्थेचा कसा व कितपत संबंध आहे, हे लक्षात घेऊनच स्वातंत्र्याच्या भवितव्याच्या दृष्टीने ही राज्यव्यवस्था आश्वासक आहे किंवा काय, हे ठरवता येऊ शकेल.

ब्रिटिश साम्राज्याच्या विरोधात एक प्रतिकारात्मक स्वातंत्र्याची चळवळ निर्माण झाली होती. पण, त्यासोबतच स्वातंत्र्याच्या रचनेचीही दुसरी रचनात्मक चळवळ निर्माण झालीच होती! ब्रिटिश साम्राज्याच्या विरोधातली प्रतिकारात्मक स्वातंत्र्याची चळवळ ज्या प्रमाणात लक्षात घेतली जाते, त्याच प्रमाणात स्वातंत्र्याची रचनात्मक चळवळ लक्षात घेतली जात नाही. कारण, प्रतिकारात्मक स्वातंत्र्याच्या चळवळीला उठाव देणे ज्यांना शक्य झाले होते, त्यांतल्या सर्वांनाच स्वातंत्र्याच्या रचनात्मक चळवळीला उठाव आणून देणे शक्य झाले नव्हते. कारण, स्वातंत्र्याच्या चळवळीची जी एक समग्र दृष्टी असावयाला हवी होती, ती प्रतिकारात्मक स्वातंत्र्याच्या चळवळीतल्या कोणालाही बाळगता आलेली नव्हती. ती दृष्टी फक्त महात्मा गांधींना व त्यांच्या नेतृत्वाला मानणाऱ्यांना बाळगता आलेली होती. म्हणून, स्वातंत्र्याचा संकल्प महात्मा गांधींच्या नेतृत्वातून जेवढा व जसा स्पष्ट होऊ शकला होता, तेवढा व तसा प्रतिकारात्मकतेतल्या स्वातंत्र्याच्या भूमिकेत जे राहिले होते त्यांना स्पष्ट होऊ शकलेला नव्हता. म्हणून, स्वातंत्र्याच्या संकल्पाची स्पष्ट भूमिका फक्त महात्मा गांधींकडे व त्यांचे नेतृत्व मान्य करणाऱ्यांकडेच होती व अन्य कोणाकडेही नव्हती, असे म्हटले तर ते वस्तुस्थितीचे निदर्शकच ठरेल व ठरलेही आहे! म्हणून, भारतीय राज्यघटना या वस्तुस्थितीचा विचार करून व तिच्या आकर्षणातूनच घडवली गेली किंवा काय, हा प्रश्न उपस्थित केला जाऊ शकतो व तो उपस्थित करायला हवाच आहे! कारण, स्वातंत्र्याच्या संकल्पाची स्पष्टता यातूनच होऊ शकते! पण, स्वातंत्र्याच्या संकल्पनेत जे भिन्न मतप्रवाह होते, त्यांतल्या प्रतिकारात्मकतेला मानणारे ते जेवढे राज्यघटनेच्या निर्मितीच्या दृष्टीने सावध राहू शकलेले होते, तेवढे स्वातंत्र्याच्या रचनात्मकतेला स्वीकारणारे सावध राहू शकले नव्हते. कारण, जे प्रतिकारात्मकतेला मानणारे होते ते स्वातंत्र्याच्या बाबतीत फक्त सत्तापरिवर्तन वा सत्ताबदलापुरतेच आकृष्ट झालेले होते. म्हणून, त्यांना स्वातंत्र्याच्या स्थितीत स्वातंत्र्याच्या रचनात्मकतेविषयी म्हणावी तशी जाण बाळगता आलीच नव्हती. कारण, अशांना जरी स्वातंत्र्य हवे होते, तरी औद्योगिक विकास पावलेल्या राष्ट्रांत औद्योगिकीकरणाची जी परिस्थिती होती तीच त्यांना भारताच्या स्वातंत्र्यात निर्माण व्हावयाला हवी होती. यामुळेच ते त्याकडे आकर्षित झालेले होते. याचे दिग्दर्शन त्या वेळचे नोबेल पारितोषिकविजेते फ्रेंच विचारवंत व तत्त्वज्ञ रोमा रोला यांच्या प्रसिद्ध झालेल्या रोजनिशीमधून केले गेले आहे. भारतात स्वातंत्र्याची चळवळ सुरू असताना महात्मा गांधी, जवाहरलाल नेहरू, रवीन्द्रनाथ टागोर आदींसह अनेक भारतीय पुढारी व विचारवंत इटालीत वास्तव्य करून असलेल्या रोमा रोला यांना त्या काळात जाऊन भेटले होते व त्यांच्याशी प्रदीर्घ चर्चाही केली होती. रोमा रोला यांची रोजनिशी फ्रेंच भाषेतून प्रसिद्ध झाली आहे. त्यांना इंग्रजी भाषा लिहिता-बोलता येत नव्हती. पण, त्यांना भेटलेल्या भारतीयांनी त्यांच्याशी इंग्रजीतूनच संवाद साधला होता. रोमा रोला यांच्या बहिणीला इंग्रजी भाषा अवगत होती. म्हणून त्या अनुवाद करून सांगणाऱ्या मध्यस्थ झाल्या होत्या. या वेळी रोमा रोलांचा जवाहरलाल नेहरूंशी जो संवाद झाला, त्यातून नेहरू महात्मा गांधींच्या ग्रामीण भारताच्या आस्थेविषयी मतभेद बाळगून होते हे स्पष्ट झाले आहे. तेव्हा, भारतीय स्वातंत्र्याच्या उद्दिष्टांविषयी महात्मा गांधी व जवाहरलाल नेहरू या दोघांमध्ये मूलभूत स्वरूपाचे मतभेद होते, हे यातूनच स्पष्ट झाले आहे. ('इन्डे' या फ्रेंच भाषेतल्या रोजनिशीचे हिन्दीत रूपांतर 'रोमँ रोलां का भारत' या शीर्षकाने हिन्दीचे लेखक विचारवंत व कथाकार (स्व.) जैनेन्द्रकुमार यांच्या दिल्लीतल्या पूर्वोदय प्रकाशनाने दोन भागांत प्रसिद्ध केले आहे. इंग्रजीत हे उपलब्ध नाही. जैनेंद्रजींच्या आग्रहावरून या रोजनिशीचे परीक्षण दोन भागांत लोकसत्ता दैनिकाचे त्या वेळचे संपादक (स्व.) गडकरी यांना माझ्याकडून लिहून हवे होते. म्हणून, मी मराठी लोकसत्तामध्ये परीक्षण लिहिले होते व ते प्रसिद्धही झाले.








जवाहरलाल नेहरू भारतीय स्वातंत्र्याच्या चळवळीत जरी अग्रस्थानावर होते, तरी महात्मा गांधींना जसे ग्रामीण भारताच्या स्वातंत्र्याचे आकर्षण होते, तसे आकर्षण नेहरूंना वाटत नव्हते. म्हणून महात्मा गांधींचा स्वातंत्र्याचा रचनात्मक दृष्टिकोन त्यांना मान्य झाला नव्हता. यामुळे ग्रामीण उद्योगांविषयी किंवा खादी-ग्रामोद्योगांसारख्या रचनात्मक कार्याविषयी ते फारसे उत्सुकही नसायचे. अर्थात, तीर्थक्षेत्रांचे पावित्र्य मानणाऱ्यांपैकी ते होते किंवा काय, हा एक त्यांच्याविषयीचा वादग्रस्त विषय म्हणता येऊ शकेल. पण, भिलाईचा लोहनिर्मितीचा भव्य उद्योग व भाकडा-नानगल धरणासारखी धरणे या सर्वांना त्यांनी आधुनिक भारताची तीर्थक्षेत्रेच मानले होते. अशाच तऱ्हेच्या औद्योगिक-यांत्रिक अवजड उपक्रमांना त्यांनी स्वातंत्र्यात उत्तेजनही दिले होते. यातून ग्रामीण भारताची उपेक्षा केली जाते आहे व शहरी अथवा नागरीकरणाला यातूनच अनावश्यक उत्तेजन वा प्रोत्साहन मिळते आहे, हे त्यांनी लक्षात घेतले नव्हते. कारण औद्योगिकीकरणातूनच नवा स्वतंत्र भारत घडावा, यावरच त्यांचा विश्वास जडलेला होता. यातूनच त्यांच्या स्वातंत्र्याच्या संकल्पनेचा दृष्टिकोन स्पष्ट होत गेला. म्हणून, महात्मा गांधींच्या ग्रामीण भारताचे स्वातंत्र्य या संकल्पनेशी किंवा संकल्पाशी जवाहरलाल नेहरू यांच्या अवजड औद्योगिकीकरणाला उत्तेजन देणाऱ्या स्वातंत्र्याच्या संकल्पनेचा किंवा संकल्पाचा कशाच बाबतीत मेळ बसण्यासारखा नव्हता, हे स्वातंत्र्यास्तव चळवळ सुरू असतानाच पुरेशा प्रमाणात स्पष्ट झाले होते. पण, महात्मा गांधींच्या नेतृत्वाअभावी स्वातंत्र्याची चळवळ चालवली जाणे शक्यच नव्हते याची ज्यांना खात्री पटली होती, त्यांतलेच एक जवाहरलाल नेहरूही होते. म्हणूनच महात्मा गांधींच्या नेतृत्वाला त्यांनी मान्यता दिली व महत्त्वही दिले होते. पण, जवाहरलाल नेहरूंसह समाजवादी किंवा अशाच अन्य कोणाचेही महात्मा गांधींच्या ग्रामीण भारताच्या स्वातंत्र्याच्या संकल्पाशी नाते जुळू शकलेले नव्हते! अशा स्थितीत स्वातंत्र्याच्या चळवळीचा स्वातंत्र्याचा संकल्प हा दोन भिन्न विचारसरणींत दुभंगलेलाच राहू शकला होता व या दुभंगलेपणातूनच महात्मा गांधींच्या स्वातंत्र्याचा संकल्प बाजूला सारून जवाहरलाल नेहरू यांच्या प्रोत्साहनाद्वारेच भारतीय राज्यघटना घडवण्याचा घाट घातला गेला व भारताची राज्यघटना अस्तित्वात आली. यामुळे भारतीय स्वातंत्र्य-चळवळीचा ग्रामीण स्वातंत्र्याला उत्तेजन देण्याचा संकल्प पुढे न्यायचा कसा, हा प्रश्न उपस्थित झालाच होता. याची योग्य ती दखल भारताच्या राज्यघटनेतूनच जी लोकशाहीची म्हणवली गेलेली राज्यव्यवस्था अस्तित्वात आणली गेली, त्या राज्यव्यवस्थेला घेताच आली नाही हे स्पष्ट झाले आहे. म्हणूनच भारतीय स्वातंत्र्याच्या रचनेचा प्रश्नही उपस्थित झाला व तो पुढे बिकटही होत गेला. यातूनच १९५१ साली तेलंगणमध्ये बोल्शेविक क्रांतीच्या समर्थक कम्युनिस्टांनी जमिनीच्य विषमतेचा प्रश्न धसास लावण्यासाठी विरोधाची विस्फोटक परिस्थिती निर्माण केली होती व जमिनीच्या संदर्भात विषमतेचा प्रश्न ऐरणीवर आणलाही गेला! हा प्रश्न सरळसरळ ग्रामीण भारताच्या स्वातंत्र्याशी निगडित होता व अजूनही तो तसाच निगडित आहे! कारण, जमीन धारण करण्याच्या विषम परिस्थितीचे म्हणावे तसे समाधान अद्यापही करता आलेले नाही! महाराष्ट्रात कूळकायदा झाला किंवा भारताच्या सर्वच राज्यांतून कमाल जमीन धारणा (लॅंड सीलिंग) कायदे अस्तित्वात आणले गेले आहेत. पण, यातून भूमिहीन शेतमजुरांचा प्रश्न, भूमी तसेच भूमीवरच्या जंगलावर आदिवासींचा नैसर्गिक हक्क प्रस्थापित करण्याचा प्रश्न, अशा कोणत्याच प्रश्नांचे समाधान अद्याप करता आलेले नाही व म्हणूनच ग्रामीण बेरोजगारी, भूमिहीनता, आदिवासींचे शोषण, अल्पभूधारकांच्या प्रश्नासह अनेक प्रश्न विस्फोटक झाले आहेत.

रोमा रोला यांची रोजनिशी जी दोन भागांत प्रसिद्ध झाली आहे, त्यातून महात्मा गांधी व जवाहरलाल नेहरू या दोघांच्या स्वातंत्र्यविषयक दृष्टिकोनांत जो मूलभूत स्वरूपाचा फरक लक्षात येतो, तोच सध्याच्या एकूण भारतीय समाजरचनेच्या मुळाशी आहे. यातूनच अस्तित्वात आलेल्या लोकशाही व्यवस्थेचे जे अपयश जाणवू लागले आहे, ते लक्षात घ्यायला हवे. पण, या बाबतीत अनेकांचे अनेक प्रकारे मतभेद होऊ शकतात व ते एका टोकाला जाणारे मतभेद म्हणताही येऊ शकतील. म्हणून, भारतीय

स्वातंत्र्य-चळवळीच्या संकल्पाचा प्रश्न अद्याप शिल्लक उरलेला आहे, असेच म्हणावे लागेल!

**६ : प्रत्ययकारी मूलभूत परिवर्तनाची चळवळ हवी**

उरलेल्या प्रश्नाची मोठी व्याप्तीही झालेली आहे. कारण, भारतीय राज्यघटनेतून निर्माण झालेली लोकशाहीची म्हणवली गेलेली व्यवस्था ही मुळातच लोकांची नाही, तर लोकांचे म्हणवल्या गेलेल्या लोकप्रतिनिधींचीच आहे, असा श्लेष काढला जातो आहे व तो भारतीय राज्यघटनेला मुळातच नाकारण्याच्या मनोवृत्तीतला होताना दिसू लागलेला आहे. नक्सली-माओवाद्यांनी त्यांची चळवळ जी सशस्त्र क्रांतीच्या अत्याचारी मार्गानेच चालवली आहे, तिला यातूनच उत्तेजन दिले जाते आहे! अर्थात, नक्सली-माओवादी सशस्त्र संघर्षाची चळवळ मर्यादित अर्थातलीच जरी मानली गेली, तरी संसदीय लोकशाही यशस्वी ठरण्याच्या परिस्थितीत सध्या दिसतच नसल्यामुळे, यातून जी काही विरोधी लोकभावना निर्माण होण्याची शक्यता गृहीत धरता येण्यासारखी आहे, त्याकडे दुर्लक्ष करून चालण्यासारखे नाही! कारण, दुर्लक्ष केल्याने नक्सली-माओवादाच्या राज्यघटनाविरोधातल्या सशस्त्र हिंसक हालचालींना उत्तेजनच मिळत राहील, हे स्पष्टच आहे. ते उत्तेजन मिळू नये अशीच जर स्वातंत्र्याच्या आस्थेतली भूमिका घ्यावयाची असेल, तर स्वातंत्र्याच्या आस्थेचेच स्वरूप भारतीय राज्यघटनेला यायला हवे, असेच वाटावे लागेल व ते गरजेचेच आहे! अर्थात, नक्सली-माओवादाच्या चळवळीतून राज्यघटनाविरोधाची जी भूमिका वठवण्याचा संकल्प घोषित केला गेला आहे, तो यशस्वी होण्याची शक्यता असो अथवा नसो; पण या अशा नक्सली-माओवादाच्या संकल्पातून जर तो यशस्वी होऊ शकला, तर भारतीय स्वातंत्र्यच नष्ट होईल, एवढे मात्र नक्कीच म्हणता येईल. कारण, नक्सली-माओवाद मुळातच स्वातंत्र्याच्या भूमिकेतला नसल्यामुळे लोकांच्या स्वातंत्र्याचे आश्वासन देण्याची पात्रता त्याच्यात कधीही येणार नाही, हे स्पष्टच आहे! तरीही भारतीय राज्यघटनेतून निपजलेल्या संसदीय लोकशाहीला यश मिळणार नसेल, तर पुढे काय करायचे असा प्रश्न उपस्थित होण्याचे टळत नाही व टाळताही येत नाही. अर्थात, तो प्रश्न उपस्थित झालाही आहे. म्हणून, नक्सली-माओवादाला नाकारणारा पण स्वातंत्र्याच्या आस्थेतला (नवा) पर्याय शोधावाच लागणार आहे व हे कोणत्याच कारणास्तव नाकारता येत नाही, हेदेखील स्पष्टच आहे! स्वातंत्र्याच्या चळवळीतल्या संकल्पाच्या उरलेल्या प्रश्नाकडे याच दृष्टीने पाहता यायला हवे या दृष्टीने अपयशाकडे धावत सुटलेल्या संसदीय लोकशाहीच्या नव्या पर्यायाचा शोध घेणे गरजेचे झालेले असून, त्याची सुस्पष्ट मांडणीही करता यायला हवी. ही मांडणी करता येण्यासारखीच सध्याची परिस्थिती पक्व व आश्वासक होताना दिसते आहे, हेदेखील नाकारून चालणारच नाही!

स्वातंत्र्योत्तर काळात परिवर्तनाच्या मानल्या गेलेल्या अनेक चळवळी झाल्या व होतही आहेत. पण, या सर्वच चळवळी भारतीय राज्यघटनेचे स्वरूप स्वातंत्र्याच्या संकल्पाच्या संदर्भात नव्याने घडवण्याच्या दृष्टीने व संसदीय लोकशाहीला नवा पर्याय शोधण्याच्या दृष्टीनेही प्रेरक ठरलेल्या दिसत नाहीत! कारण, कायद्यांची योग्य ती अंमलबजावणी केली जावी, लोकोपयोगी कायदे घडवले जावेत, भ्रष्टाचारमुक्ती साधता यायला हवी, भ्रष्ट झालेल्या सत्तेला घालवता यावे, म्हणजे सत्तापरिवर्तन घडवता यायला हवे अशाच एका मर्यादेत घुटमळताना या चळवळी दिसत आहेत! पण, यातून स्वातंत्र्याच्या संकल्पातून जी नवी शोषणमुक्त समाजरचना घडवायला हवी आहे, त्याच्या प्रेरणेतूनच या सर्व परिवर्तनाच्या चळवळी केल्या गेल्या व केल्या जात आहेत, याचा प्रत्यय आलेला नाही. म्हणून, अशा परिवर्तनाच्या चळवळी स्वतःच्या मर्यादित अर्थानेच कालसापेक्ष उपयुक्तता जरी सिद्ध करू शकल्या, तरी मूलभूत परिवर्तनाच्या दृष्टीने पुढे जाऊ शकण्याच्या पात्रतेच्या त्या ठरत नाहीत, हेच आजवर सिद्ध झालेले आहे! अशाही स्थितीत महात्मा गांधींना अपेक्षित होते त्या ग्रामीण भारताच्या स्वातंत्र्याचा प्रश्न पुढे रेटत ठेवूनच त्याला अनुसरून केलेल्या चळवळीही या देशात झालेल्या आहेत व होतही आहेत. अर्थात, त्या किती यशस्वी म्हणता येतील किंवा अपयशीच झाल्या वा होत आहेत, असेही म्हणता येईल. याचा अर्थातच शोध घेऊन त्यावर विचार करायला हवा आणि निश्चितच यावर विचार करता येण्यासारखेही आहे!

### ७ : न थांबणारी नागरीकरणातली गुन्हेगारी

औद्योगिकीकरणाच्या हव्यासातून जी मार्गक्रमणा केली गेली आहे, तिचे जे काही परिणाम निघालेले दृष्टीस पडताना दिसतात, ते लक्षात घेता जवाहरलाल नेहरू किंवा तत्सम अनेकांचा दृष्टिकोन तपासून घ्यायला हवा. कारण, स्वातंत्र्योत्तर काळात स्वतंत्र भारत ज्या एका संकल्पातून पुढे जात राहायला हवा, असे जे मानले गेले होते, त्याचे दृश्य परिणाम जागतिक पातळीवर व भारताच्या राष्ट्रीय पातळीवरही ज्या एका स्वरूपात दिसू लागले आहेत, ते अर्थातच जाणून घ्यायला हवे. कारण, मानवीय भवितव्याची जाण यातून आली आहे किंवा ती येण्याची शक्यता आहे किंवा काय, याचा उलगडा यातून होऊ शकेल. नियतकालिक ब्लिट्झचे संपादक करंजिया यांनी जवाहरलाल नेहरू यांची ते हयात असताना प्रदीर्घ मुलाखत घेतली होती व त्यावरूनच त्यांनी 'माइंड ऑफ नेहरू' हे पुस्तक इंग्रजीत प्रकाशित केले. त्यात औद्योगिकीकरणातून प्रगती साधलेल्या राष्ट्रांत विशेषतः तरुणांमध्ये गुन्हेगारीचे प्रमाण वाढते आहे, हे नेहरूंनी नमूद केले आहे. औद्योगिकीकरणामुळे गुन्हेगारीला उत्तेजन मिळते, असा याचा सरसकट अर्थ जरी घेतला नाही, तरी औद्योगिकीकरण जेव्हा अनियंत्रित होत जाते तेव्हा त्यातून गुन्हेगारीला संधी उपलब्ध होत असते, एवढे तरी मानायलाच हवे. अर्थात, जवाहरलाल नेहरू यांनी औद्योगिकीकरणातून गुन्हेगारी निर्माण होणे संभवते असे जरी म्हटले आहे, तरी औद्योगिकीकरणाचा त्याग करावा, असे त्यांनी म्हटलेले नव्हते किंवा तसे सुचवलेही नव्हते. कारण, औद्योगिकीकरणाच्या अभावी प्रगती साधता येऊ शकते, याची कल्पनाच त्यांनी केलेली नव्हती. असे जरी असले, तरी महात्मा गांधींनी भारतीय स्वातंत्र्याची जी भूमिका 'हिन्द स्वराज्य' या त्यांच्या पुस्तकात (१९०९) प्रतिपादिलेली आहे, ती लक्षात घेता भारतीय संस्कृतीचे अवशेष तुटुन-फुटुन इतस्ततः विखरून पडलेले आहेत, त्यांना जोडल्याने जे मूर्तरूप घडेल, त्यालाच महात्मा गांधींनी स्वातंत्र्य वा स्वराज्य म्हटलेले होते. म्हणून, खेड्यांत विखरून पडलेल्या संस्कृतीच्या अवशेषांना जोडल्याने स्वातंत्र्य येईल, ही जी त्यांनी धारणा करून घेतलेली होती, ती योग्य की अयोग्य यावर वाद होऊ शकतो व तो झालाही आहे. तरी पण स्वातंत्र्याचे सांस्कृतिक मूल्यच त्यांनी स्वीकारलेले होते व ते खेड्यांतूनच प्राप्त होऊ शकेल, हेच त्यांना वाटलेही होते. याविषयी मतभेद होण्याचे तसे कारण असू नये. पण, म्हणूनच स्वातंत्र्यातून ज्या कारणामुळे प्रगती साधता येऊ शकेल अशी कल्पना केली जाते, ते अद्याप सुस्पष्ट केले गेलेले नसल्यामुळे ते स्पष्ट करून घेण्याची गरज निर्माण झाली आहे. गुन्हेगारी ही मानसिक विकृतीतूनच माणसात येत असते, हे जर मान्य केले, तर विकृतीला ज्यामुळे उत्तेजन मिळते वा संधी उपलब्ध होत असते, त्यावर विचार करायला हवा. भारताच्या सामाजिक परिस्थितीत भारत जेव्हा परकीय आक्रमणात जगत होता व परकीयांचे साम्राज्य या देशात ज्या काळात राहू शकले होते, त्या काळात अशा साम्राज्यातूनच सरंजामशाहीला अनुकूलता निर्माण झाली होती व सरंजामदारवर्गांनीच परकीय साम्राज्याचे पोषणही या देशात केले होते. अलीकडच्या काळात संस्थानिक, इजारदार, इनामदार, खोत, जमीनदार, मालगुजार यांच्या अनिबंध अस्तित्वामुळे भारत ज्या स्थितीत होता, ती स्थिती आर्थिक-सामाजिक दृष्ट्या बळवंतांच्या शोषणातून होत राहणाऱ्या गुन्हेगारीतलीच होती. म्हणून संस्थानिक, जमीनदार, मालगुजार, इनामदार तसेच खोतांनी कोणतेही गैरप्रकार केले तरी त्याला गुन्हा मानलाच जात नव्हता. ती एक समाजमान्य परंपराच मानली जात होती. माझ्या एका निकटच्या उत्तरप्रदेशच्या राजपूत मित्राने मला सांगितले, की तो राजपूत असल्यामुळे त्याने कोणत्याही परस्त्रीशी तिची अनुमती न घेता समागम करणे हा त्याचा वांशिक व उच्चवर्णीय अधिकारच मानला जायचा व हा अधिकार निःसंकोचपणे भोगायला हवा, याचेच प्रोत्साहन राजपूतकुटुंबातून प्रत्यक्षात मिळतही असे. तेव्हा यातून येणारी गुन्हेगारी सामाजिक परंपरेत एके काळी खेड्यात प्रस्थापित झालेलीच होती. पण, यामुळे खेड्यातली कृषिसंस्कृती मानूनच ज्याला मान्यता मिळाली होती त्या संस्कृतीला गुन्हेगारी मान्य झालेलीच नव्हती म्हणतात! याचे महात्मा गांधींनी ज्या पद्धतीने आकलन केले होते, ते सरंजामशाहीची वैगुण्ये दर्शवणारेच होते व आहे. तेव्हा, साम्राज्ये व त्यांतले राजे हे शोषक

वर्गातलेच मानून त्यांनी भारताची समृद्ध ग्रामीण संस्कृती भ्रष्ट करण्याचा प्रघात पाडला व परकीय साम्राज्याच्या शासन करणाऱ्यांनी त्या प्रघातातूनच या देशात सरंजामशाहीचे पोषण केलेले आहे, अशा या महात्मा गांधींच्या आकलनात अतिशयोक्तीचे दोष दाखवले जातील व दाखवले गेलेही आहेत; पण, यामुळे जी राजेशाही अस्तित्वात होती किंवा अस्तित्वात आली होती, तीच समाजाच्या सांस्कृतिक मान्यतांना किंवा मूल्यांना भ्रष्ट करून सरंजामदार वर्गाच्या प्रोत्साहनातून साम्राज्यात टिकवली गेली व राजेशाही अखंडित ठेवलीही गेली, हे कोणत्याच कारणामुळे अमान्य करता येत नाही! तेव्हा, ज्या ग्रामीण पंचायतराज्य पद्धतीचे महात्मा गांधींनी समर्थन केले होते, ते साम्राज्यशाहीला व त्यातल्या राजेशाहीला सामाजिक उत्थानाचा एक शक्तिशाली पर्याय मानूनच स्वीकारलेही होते. अर्थात, या पंचायतराज्याच्या पर्यायात दोषही होतेच. याचे दिग्दर्शन डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी केलेही आहे! खेड्यात अस्पृश्य अल्पसंख्य असल्यामुळे बहुसंख्य सवर्ण जातीकडून अस्पृश्यांचे शोषण पंचायत पद्धतीतूनच केले जाते, या डॉ आंबेडकरांच्या म्हणण्यात तथ्य होते व आहे. पण अस्पृश्यता निवारण करूनच ही शोषणप्रक्रिया थांबवली जायला हवी व ती थांबवताही येऊ शकेल, यावर महात्मा गांधींनी विश्वास ठेवला होता व ते स्वत: याचे आचरणही करीतच होते. म्हणून अस्पृश्यांच्या भंगी कॉलनीतच ते दिल्लीत वास्तव्य करून राहत होते. अर्थात, महात्मा गांधींनी स्वीकारलेला अस्पृश्यता निवारणाचा दृष्टिकोन व त्याचा कार्यक्रम डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना फारसा रुचला नव्हता व पटलाही नव्हता. पण, अस्पृश्यतेचे निवारण केले जावे ही धारणा स्वातंत्र्याच्या चळवळीत महात्मा गांधींनीच रुजवलेली होती, हे नाकारताही येत नाही! महात्मा गांधींचे सहकारी जे आश्रमात व रचनात्मक कार्य करणाऱ्या संस्थांमध्ये होते, त्यांनी आश्रम व संस्थांमधून अस्पृश्यता निवारणाच्या कार्यक्रमांना प्राधान्य दिलेही होते. हे प्राधान्य सत्याग्रहापर्यंतही जाऊन पोचले होते. (स्व.) अप्पासाहेब पटवर्धन स्वातंत्र्याच्या चळवळीत रत्नागिरीच्या तुरुंगात तुरुंगवास भोगत असताना त्यांनी स्वत:साठी तुरुंगात भंगीकार्य करण्याची परवानगी तुरुंगाधिकाऱ्याकडे मागितली होती. पण, ती त्यांना मिळाली नव्हती. म्हणून, अप्पासाहेबांनी महात्मा गांधींकडून अनुमती घेऊन उपवास करून सत्याग्रह केला होता. तो यशस्वी झाला. यामुळे अप्पांना कोकणचे गांधी म्हणूनच ओळखले जात होते. तेव्हा अस्पृश्यता निवारणातून पंचायत राज्याला बळकटी येऊ शकते व यायला हवी, असे महात्मा गांधींना वाटले होते. म्हणून साम्राज्ये व राजांच्या व्यवस्थेमधून ज्या सरंजामदार वर्गाचे पोषण झाले होते, ती एक सामाजिक विकृतीच होती व या विकृतीला नष्ट करण्यासाठी पंचायतराज्य पद्धती सरसावली होती, असा जो याचा आशय महात्मा गांधींनी खेड्यातल्या संस्कृतीतून जाणून घेण्याचा प्रयत्न केला होता, तो स्वातंत्र्याच्या चळवळीत सत्याग्रही तत्त्वज्ञानाचा पुरस्कार करून स्वातंत्र्याच्या संकल्पात दाखल केलाही होता. याकडे औद्योगिकीकरणाच्या पुरस्कर्त्यांनी दुर्लक्ष केले व उपेक्षाही केली! म्हणून, खेड्याच्या परिस्थितीत स्वातंत्र्याला अनुरूप रचनात्मकता स्वीकारून त्याच्या प्रभावातून स्वातंत्र्य साध्य करण्याचे महात्मा गांधींचे प्रयत्न व त्यांची दृष्टी कोणत्याच कारणामुळे टाकाऊ ठरवता येत नाही. पण, औद्योगिकीकरणाच्या समर्थक व पुरस्कर्त्यांना हे जाणून घेणे शक्य झाले नाही. म्हणूनच औद्योगिकीकरणातून अनियंत्रित नागरीकरण झाल्यामुळे ज्या गुन्हेगारी प्रवृत्तीला वाव मिळाला आहे, ती थांबवता आली नाही व थांबवता येऊ नये याचीच एक वस्तुस्थिती निर्माण झालीही आहे!

### ८ : चिंतेचा व चिंतनाचा विषय

औद्योगिकीकरणातून नागरीकरणाला प्रोत्साहन मिळाले आहे, हे कोणालाच नाकारता येत नाही. कारण, औद्योगिकीकरणाच्या परिणामातून ग्रामीण उद्योग नष्ट झाले व हे ग्रामीण उद्योग कृषिकार्याला पोषक होते. या शेतीचे पोषण होत होते, ते यामुळे नाहीसेही झाले. यातून ग्रामीण बेरोजगारीचा प्रश्न निर्माण झाला व म्हणून खेड्यांतले लोक खेड्यांतून पलायन करून शहर व महानगरांकडे वास्तव्य करायला जाऊ लागले. शहरांत व महानगरांत अशा खेड्यांतल्या लोकांची संख्या नको तेवढी वाढतच गेली आहे व ती यापुढेही वाढतच जाणार आहे. यातून शहरांना व महानगरांना रोगट सूज आलेली






आहे. यामुळे खेडी ओस पडून कृषिकार्यावर याचा विपरीत परिणाम झालाही आहे. म्हणून, शेतकऱ्यांची स्वावलंबी शेती ही त्यांची स्वतःची राहूच नये, अशी एक नवी परिस्थिती निर्माण झाली. यातूनच फार्महाउसची यांत्रिक शेती उदयाला आली. म्हणूनच कार्पोरेट घराण्यांच्या घशात शेतकऱ्यांची शेती जाऊ लागली आहे व 'शेतकरी समाज' जो भारतीय संस्कृतीचा 'कणा' मानला जातो, तोच मोडून पडण्याच्या स्थितीला येऊन पोचला आहे. यातूनच शहरांमधली व महानगरांमधली विकृत गुन्हेगारी आकाराला आली असून, ती आता नियंत्रणाबाहेर गेलेलेही दिसत आहे. म्हणूनच शहरे व महानगरे गुन्हेगारीचे आगर झाल्याचे म्हटले जाते आहे, हे लक्षात घ्यायला हवे!

खेडी नाहीशी करूनच शहरे व महानगरे निर्माण करण्याच्या प्रकाराला जर प्रगती मानायची असेल, तर संस्कृती नाहीशी करून विकृतीचा स्वीकार करण्यासारखेच हे म्हणावे लागेल! कारण, माणसाची संस्कृती खेड्यांतूनच निर्माण झाली आहे व ती निसर्गतःच खेड्यांतूनच निर्माण होत असते. शहरे व महानगरे संस्कृतीतून निर्माण होतच नाहीत! ती नागरीकरणाच्या नियमातून ज्याला 'सिविलायजेशन' म्हटले जाते, त्यातून निर्माण होतात. कारण, खेडी नष्ट होण्याच्या विकृतीतूनच शहरे व महानगरे अस्तित्वात येऊ शकतात व आलीही आहेत. म्हणूनच विकृतीतून गुन्हेगारीला उत्तेजन मिळत असते व मिळत आलेलेही आहे. हे लक्षात घेऊनच खऱ्या अर्थाने परिवर्तनाचा दृष्टिकोन स्वीकारता यायला हवा. याचाच या वेळी परिवर्तनाच्या चळवळींमधून अभाव झालेलाच दिसून येतो आहे. म्हणून, सध्याच्या परिवर्तनाच्या म्हणवल्या गेलेल्या चळवळींद्वारे तात्कालिक आकर्षणातल्या लाभांचे आमिष लोकांना दाखवून त्याकडे लोकांना आकर्षित केले जाते व लोकदेखील अज्ञानातूनच निरुपायास्तव तात्कालिक लाभ पदरात पाडून घेण्याच्या वृत्तीतून अशा चळवळींकडे वळत असतात! पण मूलभूत परिवर्तनाचा दृष्टिकोन यातून मागे पाडला जातो व तो सोडूनही दिला जातो. पण, शोषणविरहित समाजरचना घडवणे आवश्यक आहे, त्याकडे मात्र यातून संपूर्णपणे दुर्लक्षच केले जाते आहे. यामुळे सडक्या व कालबाह्य व्यवस्थेला पर्याय देण्याचे सामर्थ्य सध्याच्या परिवर्तनाच्या म्हणवल्या गेलेल्या चळवळीत नसणेच स्वाभाविक म्हणायला हवे. म्हणून, हा एक चिंतेचा व चिंतनाचाही विषय झालेला आहे!

या देशात भारतीय राज्यघटनेच्या आदेशानुसार व त्या मर्यादेतच सामाजिक कार्य केले जाते आहे. अशा कार्याच्या संस्था-संघटना या 'एनजीओ' नावाने ओळखल्याही जातात. पण, या गैरशासकीय संस्था-संघटना सामान्यतः व बहुधा परकीय देशातल्या आर्थिक सहायतेवरच चालतात. अमेरिका व युरोपातील राष्ट्रे यासाठी प्रामुख्याने आर्थिक साहाय्य करणाऱ्यांपैकी आहेत. म्हणून, या गैरशासकीय सामाजिक कार्य करणाऱ्या संस्था-संघटना कितपत स्वतंत्र मानता येतील, असा एक प्रश्न उपस्थित केला जातो व यावर या देशात आजवर बराच खल केला गेला आहे व यापुढेही तो होत राहणार आहे. यातून जाणून घेण्याचे एवढेच, की या संस्था-संघटनांची सामाजिक कार्य करण्याची प्रेरणा स्वतंत्र नाही व ती प्रेरणा अर्थसाहाय्य करणाऱ्या अमेरिका व युरोपमधल्या राष्ट्रांचीच आहे व असू शकते, असा एक श्लेष काढला जातो, व यातूनच याचा अर्थबोध करून घेतला जातो आहे. तो बराचसा राष्ट्रीय हिताचा नाही व नसावा, असेच मानण्याकडे अनेकांचा कल झालेला आहे. कारण, अशी परकीय आर्थिक सहायता त्या त्या राष्ट्राच्या ध्येयधोरणांशी निगडित असते व हेरगिरी करण्याच्या प्रवृत्तीतलीही असू शकते, म्हणूनच राष्ट्रहिताला हे बाधकच असू शकते, असे मानण्याकडेच अनेकांचा कल होत असतो व झालाही आहे. भारतीय कायद्यांच्या आधाराने किंवा अनुमतीनेच हे अर्थसाहाय्य भारतात आयात होत असते. तरीही यातून सामाजिक कार्य म्हणवल्या गेलेल्या कोणत्याही कार्याला भारतीय हितातले मानले जाऊ नये, अशी एक धारणा यातून निर्माण होताना दिसते आहे. या अनुषंगानेच सामाजिक म्हणवल्या गेलेल्या या देशातल्या चळवळी आक्षेपार्ह ठरवण्याचा प्रयत्नही होत असतो. या सर्वच बाबतीत लक्षात घ्यायचे ते एवढेच की, अशा परकीय अर्थसाहाय्यतेतून राष्ट्रहिताला बाधक अशा काही अनिष्ट प्रवृत्तींना चालना मिळाली आहे, म्हणून त्या प्रवृती राष्ट्रविघातक ठरवल्या गेल्या आहेत. अर्थात, गैरशासकीय सामाजिक कार्य करणाऱ्या (एनजीओ) संस्था-संघटना स्वातंत्र्याच्या संकल्पाला अनुसरून कार्य करणाऱ्या म्हणता

येत नाहीत. कारण, भारतीय राज्यघटनेनुसार अस्तित्वात आलेल्या कायद्यातून स्वातंत्र्याच्या संकल्पाचे अनुसरण करणे शक्य होणार नाही व शक्य होतही नाही, असा जो एक मतप्रवाह या देशात अस्तित्वात आला आहे, तो लक्षात घेता सामाजिक कार्य करणाऱ्या संस्था-संघटना जरी कोणाकडूनही अर्थसाहाय्य घेत असतील, तरी त्यांना स्वातंत्र्याची जाणीव बाळगणारे म्हणता येत नाही व म्हणूही नये. तेव्हा परिवर्तनाचा शोषणविरहित दृष्टिकोन सध्याच्या परिवर्तनाच्या म्हणवल्या गेलेल्या चळवळींना लाभलेला नाही व हा एक चिंतेचा विषय मानला जाऊ शकतो. हे लक्षात घेऊनच परिवर्तनाच्या शोषणरहित चळवळींची अपेक्षा करायला हवी व ही अपेक्षा केली जाऊ शकते काय, हेदेखील जाणून घ्यायला हवे!

**९ : स्वातंत्र्याच्या संकल्पातलेच वर्तन हवे**

संसदीय लोकशाहीचा पुरस्कार करणारे सर्वच बाबतीत भारतीय राज्यघटनेवर अवलंबून आहेत. कारण, जी लोकशाही व्यवस्था स्वीकारली गेली व चालवली जाते आहे, त्यातूनच शोषणविरहित परिवर्तन आणणे शक्य होईल, असे त्यांना वाटत आले आहे व अजूनही वाटते आहे. म्हणून लोकशाही रुजवणाऱ्या संकल्पनेत त्यांनी लोकशाहीच्या विकेंद्रीकरणाचा दृष्टिकोन स्वीकारलाही आहे. (स्व.) बळवंतराय मेहता समितीने शिफारशी केल्यामुळे ज्या पंचायत राज्याचा पुरस्कार या देशात केला आहे, त्यातून लोकशाहीचे विकेंद्रीकरण साधले जाईल व यातूनच लोकांचा लोकशाहीच्या यशस्वितेसाठी सहभाग निर्माण करता येईल, असे मानले गेले आहे. पण, पंचायतराज्य पद्धतीतून लोकशाहीचे विकेंद्रीकरण जरी अपेक्षित असले, तरी प्रत्यक्षात सत्तेचे विकेंद्रीकरण घडवण्यावरच भर दिला गेला आहे. कारण, लोकशाहीची विकेंद्रित सत्ता पाझरत (परकोलेट) जाऊनच विकेंद्रित होत खेड्यात पोचल्याने लोकांचा प्रत्यक्ष सहभाग लोकशाहीची प्रक्रिया यशस्वी करण्यासाठी घेतला जाऊ शकेल, याचा विश्वास केला गेला आहे. पण राजकीय सत्ता केंद्रित असो अथवा विकेंद्रित असो, तिचा एक स्वतःचा स्वभाव आहे व तो स्वभाव केंद्रित व विकेंद्रित अशा दोन्ही अवस्थांत एकाच प्रकारचा असतो व त्यात परिवर्तन होतही नसते! कारण, सत्तेचा स्वभाव हा नेहमीच सर्वंकष होण्याचा असतो व यातूनच शोषणप्रक्रियेला चालना मिळत जाण्याची शक्यताही असते! म्हणून केंद्रित सत्ता विकेंद्रित होऊन खेड्यात गेल्यामुळे ती निर्दोषच होत असते वा असू शकते, असे म्हणणे कोणत्याच दृष्टीने तर्कसंगत नाही. म्हणूनच दिल्लीच्या केंद्रात किंवा राज्यांच्या राजधानीच्या केंद्रांत केंद्रात झालेली सत्ता पंचायत राज्याच्या कार्यपद्धतीतून खेड्यातल्या पंचायतीत गेल्यानंतरही सत्तास्पर्धा संपलेली नाही व त्याचे स्वाभाविकपणे निघणारे दुष्परिणामही नाहीसे होऊ शकलेले नाहीत. म्हणून, सत्तास्पर्धेतून जी गुन्हेगारी राष्ट्राच्या व राज्यांच्या केंद्रांत आलेली दिसतेच आहे, तीच गुन्हेगारी विकेंद्रित होऊन खेड्यातल्या सत्तास्पर्धेतही प्रत्यक्षात दिसते आहे. तेव्हा पंचायत राज्यपद्धतीतून लोकशाहीच्या प्रक्रियेत लोकांचा प्रत्यक्ष सहभाग निर्माण करण्याचा प्रयत्न यशस्वी झालेला आहे, असे म्हणता येत नाही व म्हणूही नये! म्हणूनच लोकशाहीच्या व्यवस्थेत लोकांचा प्रत्यक्ष सहभाग निर्माण करण्याचा प्रश्न ज्या स्वरूपात यापूर्वी होता, त्या स्वरूपातच तो अद्याप शिल्लक उरलेला आहे! म्हणून महात्मा गांधींनी ज्या पंचायत राज्याची कल्पना केली होती त्यात व शासकीय पंचायत राज्याच्या पद्धतीत मूलभूत स्वरूपाचा फरक आहे, हे लक्षात घ्यायला हवे. महात्मा गांधींच्या पंचायत राज्यात प्रत्यक्ष निवडणुकीचा स्वीकार केला गेलेलाच नव्हता, अप्रत्यक्ष निवडीचा पुरस्कार केला गेला आहे. याला समुद्री वलय म्हणजेच 'ओशनिक सर्कल' म्हटले गेलेले आहे. शासकीय पंचायत राज्यात मात्र प्रत्यक्ष मतदानातून निवडणुकीचा पुरस्कार केला गेलेला आहे. तेव्हा, स्वातंत्र्याच्या संकल्पात लोकांचा व्यवस्थेत प्रत्यक्ष सहभाग निर्माण करण्याचा प्रश्न हा संसदीय लोकशाहीच्या प्रत्यक्ष कारभारातून अद्यापही सोडवता आलेला नाही, हे स्पष्ट झाल्यामुळे संसदीय लोकशाहीची लोकांच्या स्वातंत्र्याच्या संदर्भात मान्य अशी उपयुक्तता सिद्ध करता येणे या क्षणापर्यंत तरी शक्य झालेलेच नाही. खरेतर हेच लक्षात घेऊन लोकांच्या स्वातंत्र्याच्या संदर्भातच पुढची उपाययोजना करायला हवी आहे. म्हणूनच व्यवस्थेत लोकांचा प्रत्यक्ष सहभाग निर्माण करण्याच्या दृष्टीने स्वातंत्र्याचा संकल्प म्हणून काही असू शकेल काय, यावर विचार करायला हवा आहे.

पण, याला बराच उशीर झालेला आहे. म्हणूनच स्वातंत्र्याच्या भूमिकेहून वेगळ्याच भूमिकेतून विचार करणाऱ्यांचे पंथ या देशात निर्माण झाले व हे सर्व पंथ हुकूमशाही व फॅसिझम या दोन मतप्रवाहांतलेच म्हणता येऊ शकतील अशाच एका स्वरूपाचे दिसू लागलेले आहेत. कोणत्याही कारणास्तव जर का यांना यश प्राप्त होऊ शकले तर स्वातंत्र्याचा संकल्प नुसताच अडगळीत पडणार नाही, तो नष्ट होण्याची प्रक्रिया यातून सुरू होईल व सरतेशेवटी स्वातंत्र्याचा संकल्प नष्टही होईल! म्हणून, स्वातंत्र्याच्या संकल्पाचा विचारच महत्त्वाचा मानून त्याच्या संदर्भातच पुढची उपाययोजना केली जाऊ शकते काय आणि याचे संकेत देणारे उपक्रम राबवले जाऊ शकतील का, हे पहायला हवे. अर्थात या दिशेने पावले उचलली गेली असतील तर ते जाणून घ्यायला हवेच आहे! कारण, हे जाणून घेणे सर्वच दृष्टीने आता अतिशय गरजेचे होऊन बसलेले आहे.

स्वातंत्र्योत्तर काळात स्वातंत्र्याच्या संकल्पाविषयी आस्था बाळगून जे उपक्रम राबवले गेले, त्यांत विनोबांच्या भूदान-ग्रामदान कार्याचा प्रामुख्याने उल्लेख करायला हवा. कारण, यातूनच स्वातंत्र्याच्या संकल्पाला अनुसरून नवी व्यवस्था निर्माण करता येऊ शकेल, याचे एक आश्वासन दिले गेले होते. या कार्यातल्या यशापयशाविषयी बरीच चर्चा देशविदेशांत झालेलीच आहे. पण संसदीय लोकशाहीला सशक्त पर्याय निर्माण करण्याचा यातूनच सर्वप्रथम प्रयत्न केला गेला, हे अर्थातच लक्षात घ्यायला हवे. पण, संसदीय लोकशाहीच्या कार्यपद्धतीला हे मान्य होण्यासारखे नव्हते व मान्य झालेही नाही. कारण, बहुमताच्या आधारावरच संसदीय लोकशाही निर्माण केली जाते व स्थिरही केली जाते. पण, विनोबांनी भूदान-ग्रामदानात सर्वसंमती व सर्वानुमती स्वीकारल्यामुळे, यातून निर्माण होणारी व्यवस्था संसदीय लोकशाहीला अनुकूल ठरणार नाही, असेच संसदीय लोकशाहीच्या पुरस्कर्त्यांनी मानले. म्हणून अशा समर्थक-पुरस्कर्त्यांनी विनोबांना द्यायला हवा होता तसा प्रतिसाद दिला नाही, हे स्पष्ट झालेच आहे! पण, यातूनच स्वातंत्र्याच्या चळवळीतल्या स्वातंत्र्याच्या संकल्पाकडे संसदीय लोकशाहीच्या पुरस्कर्त्या व समर्थकांनी केवळ दुर्लक्षच केले असे नव्हे, तर याची उपेक्षाही केली, असेच म्हटले जाईल. कारण, याचा जो प्रत्यक्ष इतिहास घडला तो याहून वेगळा नव्हता व नाही, असेच म्हणावे लागते! ही स्थिती लक्षात घेऊन जयप्रकाश नारायण यांनी प्रत्यक्ष लोकशाहीत लोकसहभागाचा (पीपल्स पार्टिसिपेटरी डेमॉक्रसी) पुरस्कार केला होता. हा त्यांनी केलेला पुरस्कार महात्मा गांधींनी ज्या सत्याग्रह संघर्षाचा स्वीकार केला होता त्याला उभारी देणारा होता. म्हणून, जयप्रकाश नारायण यांनी बिहारमध्ये विद्यार्थ्यांच्या वतीने भ्रष्टाचार-विरोधी संघर्षाची व लोकांच्या वतीने जनसंघर्षाची चळवळ उभी केली होती व ती देशव्यापीही झाली होती. यातून केंद्रात सत्तापरिवर्तन घडून आले व अनेक राज्यांतही हे सत्तापरिवर्तन घडून आले होते! पण या परिवर्तनातून 'संपूर्ण क्रांती' व्हावी हे जे जयप्रकाश नारायण यांना अपेक्षित होते, त्याची यथायोग्य व्यूहरचना पुढे जाऊन होऊ शकली नाही. म्हणून, जयप्रकाशांची संघर्षाची लोकचळवळ अपूर्णच राहिलेली आहे. पण महात्मा गांधीनंतर सत्याग्रहाचा दृष्टिकोन स्वीकारून त्याला पुष्ट करण्याचा प्रयत्न स्वातंत्र्यात फक्त जयप्रकाश नारायण यांनीच केला होता व संसदीय लोकशाहीला पर्याय शोधण्याचा प्रयत्न यातूनच केला गेला होता. अर्थातच हा एक इतिहास घडलेला आहे. तेव्हा, विनोबा आणि जयप्रकाश नारायण या दोघांनी संसदीय लोकशाहीला पर्याय शोधण्यासाठी जे उपक्रम राबवले, ते यशस्वी झाले असते, तर स्वातंत्र्याच्या चळवळीतून जो संकल्प प्रस्तुत केला गेला होता, त्याला पूर्णता देण्याच्या दृष्टीने पुढचे पाऊल नक्कीच पडू शकले असते. म्हणून, यावर विचार करून व याच्या आधारानेच नव्या परिवर्तनाच्या चळवळीची अपेक्षा केली जाऊ शकेल. कारण ती या वेळची स्वातंत्र्याच्या संदर्भातली मूलभूत व महत्त्वाची गरज झालेली आहे. पण, हे जर का शक्य होणारच नसेल, तर नक्सली-माओवादाचा पर्याय लोकांसमोर आणलाच गेला आहे, त्यालाच संधी उपलब्ध होण्याची शक्यता आहे, हे कोणत्याच कारणास्तव नाकारता येणार नाही, हे स्पष्टच आहे! कारण, भारतीय समाज सदासर्वकाळ 'यथास्थिति' (स्टेट्सको) मध्ये राहू शकणार नाही. कारण, सध्याच्या जागतिक परिवर्तनाच्या रेट्यामुळे

तो कोणत्या ना कोणत्या पर्यायाचा नक्कीच स्वीकार करेल, याविषयी शंका बाळगता येत नाही व शंका बाळगूही नये! पण, नक्सली-माओवादाचा पर्याय स्वीकारल्यामुळे भारतीय स्वातंत्र्याचा संकल्प निश्चितच मागे पडेल व महात्मा गांधींनी १९१७ च्या बोल्शेविक क्रांतीनंतर ज्या सत्याग्रही तत्त्वज्ञानाचा पुरस्कार केला होता, त्याला भारतापुरते तरी भविष्य उरेल काय, याविषयी शंका उपस्थित होईल. अर्थात, महात्मा गांधींनी परिवर्तनाचा, सत्याग्रही तत्त्वज्ञानाचा पर्याय दिला तो जगाला निश्चितच दिशा देण्याच्या दृष्टीने महत्त्वाचाच मानला गेला आहे व जगभर याचे प्रयोगही केले जात आहेत. पण, भारताची परिस्थिती यापासून वंचित राहू नये याचाच विचार करायला हवा आहे! म्हणून, या देशातल्या परिवर्तनाच्या मानल्या गेलेल्या चळवळींनी आपल्या विचारसरणीची व कार्यपद्धतीची फेरमांडणी करायला हवी आहे. या मांडणीत नक्सली-माओवादाचा दुस्वास करण्याची आवश्यकता वा गरज मानूच नये. कारण, एक पर्याय म्हणूनच नक्सली-माओवाद पुढे आलेला आहे व त्याला जागतिक पृष्ठभूमी लाभण्याची शक्यताही सध्याच्या परिस्थितीत निर्माण होताना दिसते आहे. तेव्हा, नक्सली-माओवाद गुन्हेगारीच्या पातळीवर जाऊ नये व राहू नये याची काळजी घेणेही गरजेचे झाले आहे. या दृष्टीने नक्सली-माओवादाच्या उद्दिष्ट व व्यूहरचनेत यथायोग्य परिवर्तन घडून यावे या दिशेने पावले उचलली जायला हवीत. कारण, या बाबतीत विनोबा आणि जयप्रकाश नारायण या दोघांनी वेळोवेळो नक्सली-माओवाद्यांच्या बाबतीत जी भूमिका घेतली होती, ती केवळ विरोधाचीच नव्हती; तर नक्सली-माओवादाला सत्याग्रही तत्त्वज्ञानाकडे वळवण्यास संधी उपलब्ध करून द्यावी, या बाबतीत ही त्यांची भूमिका होतीच, हे लक्षात घ्यायला हवे! अर्थात, स्वातंत्र्याच्या चळवळीतल्या संकल्पाला साजेसेच हे वर्तन मानायला हवे आहे.

**उपसंहार :**

स्वातंत्र्यास्तव केल्या गेलेल्या स्वातंत्र्यपूर्व काळातल्या चळवळींचा संदर्भ स्वातंत्र्योत्तर काळात नसणेच स्वाभाविक आहे. पण, म्हणून स्वातंत्र्याची भूमिकाच संपुष्टात येण्याची जर परिस्थिती निर्माण झाली असेल किंवा होत असेल, तर स्वातंत्र्योत्तर काळातही स्वातंत्र्याच्या चळवळीचा एक नवा संदर्भ असू शकतो व तो असावयालाही हवाच आहे. कारण, स्वातंत्र्याची उपासना कधीच संपणारी नसते हेच स्वातंत्र्याच्या जाणिवेतले असते. म्हणून, या जाणिवेचे ज्यांना भान होते, त्यांनी स्वातंत्र्याचीच भूमिका सदैव वठवत राहण्याच्या उपक्रमांना नेहमीच चालना दिलेली आहे व यातून स्वातंत्र्याच्या चळवळीची नित्यनूतनता व प्रासंगिकता सिद्ध करणेच त्यांना गरजेचे व महत्त्वाचे वाटले होते. याला अलीकडच्या काळात स्वातंत्र्याच्या चळवळीतल्याच दोन योद्ध्यांनी नव्याने उजाळा दिला व स्वातंत्र्याचा संकल्प राजकीय स्वातंत्र्यपूर्व काळात जेवढा महत्त्वाचा मानला गेला होता तेवढाच स्वातंत्र्योत्तर काळातही तो महत्वाचा मानायला हवा, याची जाणीव भारतीयांना करून दिलीही आहे. यातूनच स्वातंत्र्याच्या चळवळीची निरंतरता त्यांनी अधोरेखित केली व ही एक स्वातंत्र्याची निरंतर प्रक्रियाच असते व आहे, हे भारतीयांच्या मनांत व हृदयांत ठसवण्याचा प्रयत्न केलाही आहे. यासाठी अनेकानेक उपक्रमही त्यांनी राबवले!

महात्मा गांधींनी १९४० साली प्रथम सत्याग्रही म्हणून ज्या विनोबांची निवड केली होती, त्या विनोबांनीच स्वातंत्र्योत्तर काळात स्वातंत्र्याची पूर्णता ग्रामस्वराज्याच्या स्थापनेतूनच होऊ शकेल, हे जनमानसावर ठसवण्यासाठी भूदान व ग्रामदानाची चळवळ निर्माण केली व चालवली. स्वातंत्र्याच्या चळवळीत हजारीबाग तुरुंगाच्या भिंतीवरून उडी घेऊन नेपाळात पलायन करण्याचे धाडस जयप्रकाश नारायण यांनी केले व नेपाळच्या जंगलात राहूनच भूमिगत आकाशवाणीचे प्रसारण केले होते. यातून भारतीय तरुणांना त्यांनी स्वातंत्र्याच्या चळवळीत झोकून देऊन सहभागी होण्याची प्रेरणा व स्फूर्ती दिली होती. आयुष्याच्या उतार वयात स्वातंत्र्योत्तर काळातच विद्यार्थ्यांची भ्रष्टाचार-विरोधाची चळवळ निर्माण केली व यातून सत्याग्रह-संघर्ष यशस्वीपणे चालवला. अर्थात, स्वातंत्र्य-चळवळीतल्या संकल्पांची पूर्तता करण्याची प्रेरणा भारतीयांना पुन्हा एकदा नव्याने दिली होती. अशा तऱ्हेने भारतीय स्वातंत्र्याच्या संकल्पाचे भान करून देण्याचे उपक्रम सातत्यपूर्वक राबवावे लागतील, यात शंका नसावी. म्हणूनच स्वातंत्र्याची चळवळ सतत म्हणजे निरंतरपणे

करीतच राहावे लागणार आहे, याचे भान ठेवायला हवे!

ധരധരധ

## 'मानववादाची विविध परिमाणे' : प्रकरण तिसरे

# 'धार्मिक मानववाद'

प्रतिभा कामत

ह्याआधीच स्पष्ट केल्याप्रमाणे मानववाद प्रामुख्याने मानवकेंद्रित इहवादी तत्त्वज्ञानावर आधारलेला विचारप्रवाह आहे. त्याचे स्वरूप मूलतः धर्मनिरपेक्ष आहे. त्यामुळेच 'धार्मिक मानववाद' ह्या अभिव्यक्तीत विरोधाभास जाणवणे नैसर्गिक आहे. ह्या संदर्भात एक गोष्ट लक्षात घेणे आवश्यक आहे की, आरंभीच्या काळातील मानववाद्यांना आपल्या जीवनात काही विशिष्ट समस्यांना सामोरे जावे लागत होते. ह्यांतील बहुतेक मंडळी चर्चच्या सेवेत रुजू होती. त्यामुळे धर्माला पूर्णपणे धुडकावून लावणे त्यांना शक्य नव्हते. तसे करण्याचा त्यांचा हेतूही नव्हता. त्यांचा विरोध धर्म, बायबल किंवा येशू ख्रिस्त ह्यांना नव्हता; परंतु धर्माचे जे विकृत आविष्कार व्यक्त होत होते, ते त्यांना अमान्य होते. ते संन्यस्त वृत्तीच्या विरुद्ध होते. ह्या जगातील सुखांचा उपभोग घेणे त्यांना मान्य होते. चर्चच्या अधिकाऱ्यांनी जनतेवर जी विरक्त आयुष्याची मूल्ये लादली होती, त्यांचे परीक्षण करताना त्यांच्या लक्षात आले, की हे चर्चचे अधिकारी स्वतः संपत्ती, मद्य, स्त्रिया ह्यांचा उपभोग घेत चैनीत जगत होते. चर्चच्या अधिकाऱ्यांच्या ह्या दांभिकतेमुळेच मार्टिन ल्यूथरसारखी माणसे चर्चविरुद्ध बंड करून उठली.

काटेकोरपणे विचार करता ल्यूथरला मानववादी म्हणता येईल का, असा प्रश्न उपस्थित केला जाऊ शकतो. परंतु मानववादाचेही विविध आविष्कार आहेत. एखाद्या अधिकारी व्यक्तीने व्यक्त केलेले मत तुम्हाला पटत नसेल तर ते स्वीकारण्याचे तुमच्यावर बंधन नाही, हा संदेश पुनरुज्जीवनकालीन विचारप्रवाह व धर्मसुधारणेची चळवळ ह्या दोहोंकडून दिला गेला. परंतु ह्या दोहोंत मूलभूत भेद आहेत. धर्मसुधारणेची चळवळ ही धार्मिक चळवळ होती. पुनरुज्जीवन कालखंडात माणसाची आत्मप्रतिष्ठा आणि त्याचे मूल्य ह्यांची जशी चर्चा झाली, तशी चर्चा धर्मसुधारणेच्या चळवळीत झाली नाही. परंतु एखाद्या प्रश्नाची मुक्तपणे केलेली चर्चा आणि परीक्षण ह्यांना ह्या चळवळीने प्रोत्साहन दिले. ह्या गोष्टी मानववादाच्या केंद्रस्थानी आहेत. धर्मसुधारणेच्या चळवळीने पोप आणि चर्च ह्यांच्या अधिकाराला आव्हान दिले; परंतु ही चळवळ ख्रिस्त किंवा बायबल ह्यांविरुद्ध नव्हती. मानववादी दृष्टिकोनाच्या ह्या आविष्कारांना धार्मिक मानववाद असे म्हणता येईल.

आपण केलेल्या पापातून मुक्त होण्यासाठी व्यक्तीने धर्मगुरूजवळ 'कबुलीजबाब' देण्याची पद्धती त्या काळी स्वीकारली गेलेली होती. हा कबुलीजबाब दिल्यानंतर पापमुक्तीचे पत्रक (indulgences) धर्मगुरूकडून दिले जाई व ह्या पत्रकाबद्दल त्या व्यक्तीकडून शुल्क घेतले जाई. अशा पत्रकांच्या विक्रीविरुद्ध मार्टिन ल्यूथरने जो संघर्ष केला, त्यामधून धर्मसुधारणेच्या चळवळीचा उगम झाला. ह्या संदर्भातील आपल्या ९५ सिद्धान्तांमध्ये त्याने ह्या प्रथेवर कडाडून हल्ला चढविला आणि चर्चच्या अधिकाराला आव्हान दिले.

त्याच्या मते साधू आणि मठ हे निरर्थक आहेत. आपण स्वतःच प्रत्यक्ष बायबल वाचणे योग्य आहे. ईश्वरावर ठेवलेल्या श्रद्धेने पापाचे डाग धुवून जातात. आपल्या कृतीसाठी श्रद्धा हेच एकमेव समर्थन, आहे ह्या ल्यूथरच्या मताचा नंतरच्या कालखंडातील धार्मिक विचारांवर बराच परिणाम झाला. श्रद्धेमुळेच मुक्ती मिळत असेल तर धर्मगुरूंच्या दलालीची आवश्यकताच नाही. प्रत्येक माणूस स्वतः आपला निवाडा करू शकतो. (ह्या संदर्भात हे लक्षात घेणे आवश्यक आहे की, धर्मगुरूंना बाजूला सारून थेट बायबलकडे आपण जावे हा विचार इंग्लंडमध्ये जॉन विक्लीक ह्यांनी व्यक्त केला होता. इतिहासकार त्यांचे वर्णन धर्मसुधारणा चळवळीतील 'पहाटेचा तारा'असे करता. त्यांनी बायबलचे लॅटिनमधून इंग्लिशमध्ये भाषांतर केल्यामुळे ते सर्वांना समजेल अशा

स्वरूपात उपलब्ध झाले.)

ल्यूथरवर पाखंडीपणाचा आरोप केला गेला. आरंभीच्या काळात तरी इरॅस्मससारख्या मानववाद्यांनी त्याला पाठिंबा दिला. परंतु ज्या वेळी त्याने चर्चशी संपूर्णपणे संबंध तोडण्याचे ठरविले, त्या वेळी इरॅस्मसने आपला पाठिंबा काढून घेतला. इरॅस्मस हा मनाने मानववादीच होता. त्याने मठातील साधूंचे गैरवर्तन आणि संन्यस्तमार्ग ह्यांवर टीका केलेली आहे. परंतु थेट बायबलकडे जाऊन आपणच आपला निवाडा करावा, हे ल्यूथरचे मत त्याला मान्य नव्हते.

इरॅस्मसच्या मते साधूंनी कौटुंबिक जीवनाचा लाभ घेण्यात गैर काहीच नाही. त्याच्या मते विवाह ही अत्यंत महत्त्वाची सामाजिक संस्था आहे. त्याने चर्चशी संबंध पूर्णपणे तोडले नाहीत; परंतु मानववादी दृष्टिकोनातून त्याने अंधश्रद्धा, अज्ञान आणि सामाजिक अन्याय ह्यांवर टीका केली. धर्माची बंधने काटेकोरपणे पाळणाऱ्या साधूंवर त्याने कोरडे ओढले. बुटांच्या नाड्यांना किती गाठी असाव्यात, आजूबाजूला कोणत्या रंगांच्या वस्तू ठेवाव्यात, केस किती बोटे लांब असावेत, किती तास झोपावे इ. विषयीचे नियम निरर्थकच नव्हे तर हास्यास्पद आहेत. पोप म्हणजे पिता, मूर्तिमंत पावित्र्य. पोपने ख्रिस्ताचे अनुकरण करून दारिद्र्य, कष्ट, धार्मिक शिकवण, क्रूस ह्यांची दखल घेऊन ऐहिक गोष्टींविषयी अनासक्ती बाळगावी. परंतु प्रत्यक्षात मात्र हे पोप वेगवेगळ्या अपवित्र कार्यांत गुंतून चैनीचे जीवन जगताना आढळतात. इरॅस्मसने साधूंवरही टीका केलेली आहे. त्याच्या मते लोक साधूंबद्दल पूज्यभाव दाखवितात तो त्यांच्या जीवनशैलीसाठी नव्हे, तर त्यांच्यामध्ये काही जादू-चमत्कार करण्याचे सामर्थ्य आहे ह्या भावनेतून. चर्च आणि सार्वजनिक जीवन ह्या ठिकाणी होणाऱ्या विविध समारंभांवर त्याने कडक टीका केलेली आहे. त्याने अवशेषांच्या पूजेवरही ताशेरे ओढले आहेत. खरोखर हे अवशेष अस्सल असतात का, ह्याबद्दल तो शंका व्यक्त करतो. ह्या सर्व कृती अर्थशून्य आहेत. त्याच्या मते धर्माची नैतिक शिकवण अधिक महत्त्वाची असते.

वाङ्मयात अतिशय रस असल्यामुळे त्याने 'नवा करार'चे संपादन केले. त्याच्या मते सामान्य माणसाने ख्रिश्चन धर्मग्रंथ स्वतः वाचावेत. आपल्या 'मूर्खपणाची स्तुती' (Praise of folly) ह्या लिखाणात त्याने धर्मोपदेशकांवर भरपूर टीका केलेली आहे.

ल्यूथर आणि झ्विंगली ह्या दोघांच्या मते धर्मामध्ये मुक्तीविषयी काही तत्त्व असणे आवश्यक आहे. इरॅस्मसला हे मत मान्य नव्हते. त्याच्या मते धर्म योग्य वर्तनाचा मार्गदर्शक असतो. धर्माचे प्रमुख कार्य नैतिक आहे. ख्रिस्ताने चर्च स्थापून पोपची नेमणूक केलेली नव्हती. काही ऐतिहासिक घटनांमुळे ती अस्तित्वात आली हे खरे असले, तरी असा प्रमुख असणे ही व्यावहारिक गरज आहे. त्यामुळे चर्चला मार्गदर्शन मिळते.

ल्यूथर हा मूलतः धार्मिक प्रवृत्तीचा होता आणि सखोल धार्मिक अनुभवावर त्याचा विश्वास होता. परंतु आपण आणि ईश्वर ह्यांमध्ये चर्चची मध्यस्थी त्याला मान्य नव्हती. एका अर्थी त्याने धार्मिक ज्ञानाच्या सत्यतेविषयीच्या निकषाचा प्रश्नच उपस्थित केला. त्याच्या मते धर्मग्रंथ वाचल्यानंतर आपली सदसद्विवेकबुद्धी आपणास जे सांगेल ते सत्य. त्याच्या ह्या मतामुळे त्याच्या विरोधकांना भीतियुक्त धक्काच बसला. सत्याच्या निकषाविषयी समस्या उभी करणे हे क्रांतिकारक होते. रिचर्ड पॉपकिनने ह्या संदर्भात म्हटले आहे – "लिपझिग्ला उघडलेल्या ह्या पॅडोरा बॉक्सचे, केवळ ईश्वरशास्त्रातच नव्हे, तर मानवाच्या संपूर्ण बौद्धिक क्षेत्रात, दूरगामी परिणाम झालेले आढळतात."*

इरॅस्मस ल्यूथरची मते स्वीकारू शकला नाही. त्याच्या मते खऱ्या अर्थाने ख्रिश्चन जीवन जगण्यासाठी स्वातंत्र्य आवश्यक आहे. ज्या वेळी चर्चने इरॅस्मसला ल्यूथरविरुद्ध मते मांडण्यासाठी सांगितले, त्या वेळी त्याने 'निर्णयस्वातंत्र्य' ही समस्या निवडली; कारण ह्या बाबतीत त्याची मते ल्यूथरच्या मतांहून भिन्न होती. इरॅस्मसचा माणसाच्या चांगुलपणावर विश्वास होता. ल्यूथरचा पूर्वनियोजित दैववादावर विश्वास होता. इरॅस्मसच्या मते हे मत म्हणजे मध्ययुगीन 'प्रथम प्रमाद'

---

* Popkin Richard H.; The History of Sekpticism from Erasmus to Descartes; Harper and Row 1968, P. 4.

अनुक्रमणिका

(Original Sin) ची रेंगाळणारी छाया आहे. ल्यूथरने रोमवर केलेल्या टीकेमुळे बहुतेक मानववादी ल्यूथरवर खूष होते. परंतु ज्या वेळी 'निर्णयस्वातंत्र्या' ची चर्चा मानवाद्यांमध्ये होऊ लागली, त्या वेळी ल्यूथरच्या ह्याविषयीच्या कल्पना त्यांना अस्वीकारार्ह वाटू लागल्या. इतिहासकारांनी निरीक्षण केल्याप्रमाणे ल्यूथर आणि इरॅस्मस ह्यांमधील संघर्ष तत्त्वज्ञानीय आणि समाजशास्त्रीय दृष्टिकोनांतून विचार करता महत्त्वाचा आहे. कॅलव्हिनने विवरण केलेली ही समस्या आणि त्याचा पावित्र्यवाद (Puritanism) ह्याचा अनेक देशांत संपूर्ण जीवनशैलीवर प्रभाव पडलेला आढळतो. ह्या संघर्षातून परस्परविरोधी अशा दोन जीवनविषयक संकल्पनांचा आविष्कार होतो. इरॅस्मसच्या मते वैयक्तिक मुक्तीचा चिंतनात्मक दृष्टिकोनातून विचार करणारा धर्म हा खरा धर्मच नव्हे. धर्म आणि ईश्वरशास्त्र ह्यांचे समाजाभिमुखी काही महत्त्वाचे कार्य असते. वास्तव विश्वापासून फारकत घेऊन केवळ पोकळीत अस्तित्वात असलेले ईश्वरशास्त्र म्हणजे मूर्खपणा (folly)आहे. धर्म आणि धर्मशास्त्र ह्यांचे महत्त्वाचे कार्य माणसाला नीतिनियम पुरविणे हे आहे. इरॅस्मसने स्वतःला सर्व धार्मिक पंथांपासून मुक्त ठेवले. त्याला मध्यम मार्ग पसंत होता.

ह्या ख्रिश्चनधर्मीय मानववाद्यांच्या संदर्भात नोंद घेण्यासारखा महत्त्वाचा मुद्दा म्हणजे ते पारंपरिक श्रद्धेविरुद्ध होते, तरी ते पाखंडी बनले नाहीत. त्यांच्या ठिकाणी ठाम नैतिक श्रद्धा होत्या. त्यांना चर्च आणि पोपबद्दल आदर नसला, तरी ख्रिस्त आणि बायबल हे अंतिमं श्रद्धेचे मुद्दे होते.

ल्यूथर, इरॅस्मस, कॅलव्हिन हे स्वतः पाखंडी नव्हते; परंतु त्यांच्या आणि विशेषतः ल्यूथरच्या शिकवणुकीच्या परिणामांमुळे अनेकांमध्ये पाखंडी प्रवृत्ती निर्माण झाली. मानववाद्यांच्या विद्वत्तेमुळे मध्ययुगीन चर्चबद्दल असलेला आदर नष्ट झाला होता. लॉरेंझो व्हॅलाने धर्मगुरूंनी धार्मिक ग्रंथाची भ्रष्ट नक्कल केली आहे, असा आरोप केला होता. अशा रीतीने चर्चवर हल्ला करण्यासाठी ल्यूथरला अनुकूल वातावरण लाभले.

पाखंडीपणाकडे वळलेल्या लोकांच्या विचारांचा प्रभाव उच्चवर्गातील लोकांवर फार मोठ्या प्रमाणात पडला. इरॅस्मसच्या शिकवणुकीचा त्यांच्यावर परिणाम झाल्यामुळे आध्यात्मिक श्रद्धेवर भर देऊन त्यांनी माफीपत्र, यात्रा, उपवास इ. चे महत्त्व नाकारले. त्यांनी वाङ्मयीन संस्था (ज्या aristocratic chambers of rhetoric म्हणून ओळखल्या जात) स्थापून उपास-तापास, प्रार्थना, यात्रा, संतांच्या स्मृतिप्रीत्यर्थ मेणबत्त्या जाळणे इ. गोष्टींना विरोध केला.

इतिहासकारांनी निरीक्षण केल्याप्रमाणे ह्या धार्मिक बंडखोरीच्या वातावरणाला नव्याने विकसित होणाऱ्या उद्योगधंद्यांमुळे आणि व्यापारामुळे चालनाच मिळाली. त्यामुळे उत्तर युरोपच्या सर्व भागांतील सामाजिक आणि आर्थिक विकासात पाखंडी विचारसरणी अलगदपणे विकसित झाली.

प्रॉटेस्टंट पंथीयांमध्ये झ्विंगली हे एक महत्त्वाचे व्यक्तिमत्त्व आहे. ल्यूथरने ज्याप्रमाणे जर्मनीत चर्चविरुद्ध वातावरण निर्माण करण्याचे कार्य केले, तसेच कार्य झ्विंगलीने स्वित्झर्लंडमध्ये केले. स्विस धर्मसुधारणेचा तो गुरू होता. ल्यूथरला न लाभलेल्या अशा लोकशाही वातावरणात तो वाढला. धर्मनिरपेक्ष स्वातंत्र्यात त्याला रस होता. मानववादी परंपरेत त्याचे शिक्षण झालेले होते. त्याच्यावर इरॅस्मसच्या शिकवणुकीचा प्रभाव होता. त्याच्या मते ख्रिश्चन ईश्वरशास्त्र म्हणजे 'सर्मन ऑन द माउंट' वर आधारलेले सरळसोपे नीतिनियम होत. मानववादी दृष्टिकोनातून त्याचा यात्रांना विरोध होता. त्याने चर्चच्या अनेक व्यवहारांवर आक्षेप घेतलेला होता. 'प्रथम प्रमाद' (Original Sin) चा दुर्दैवी वारसा लाभल्यामूळे माणूस पूर्णपणे पतित मानव आहे, हे ल्यूथरने स्वीकारलेले मत त्याला मान्य नव्हते. येशू ख्रिस्ताच्या श्रद्धेचे जतन करणारी चर्च ही लोकशाही संस्था आहे, असे मत त्याने मांडले. ख्रिश्चन धर्म म्हणजे येशू ख्रिस्त हा ज्याचा एकमेव प्रमुख आहे आणि धार्मिक ग्रंथ ज्याचा कायदा आहे, असे एक चर्च आहे. ल्यूथरने झ्विंगलीवर कडक टीका केली आणि त्यामुळे प्रॉटेस्टंट चळवळीत फूट पडली.

ज्याला धार्मिक मानववाद म्हणता येईल असा जॉन कॅल्व्हिन हा आणखी एक विचारवंत. इरॅस्मसच्या लिखाणाचा त्याच्यावर मोठा प्रभाव पडलेला होता. आपल्या

कार्याची सुरुवात त्याने मानववादी म्हणून साध्या नैतिक धर्मशास्त्राच्या अभ्यासापासून केली. चर्चच्या अनेक व्यवहारांच्या यथार्थतेविषयी फ्रान्समध्ये लोक चर्चा करू लागले होते. कॅल्व्हिनवर ह्या मतांचा परिणाम झाला. त्याच्यावर इरॅस्मसचा प्रभाव होता, परंतु ल्यूथरच्या काही कल्पनांचेही त्याला आकर्षण होते. त्याच्या 'ख्रिश्चन धर्माच्या संस्था' ( Institutes of Christian Religion) ह्या ग्रंथात आपणास त्याने स्वतः धर्मग्रंथाच्या अर्थाचे केलेले विश्लेषण आढळते. जरी मानववादी विचारवंतांच्या मार्गदर्शनाखाली त्याने अभ्यास केलेला असला, तरी ऐहिक सुखांचा उपभोग हा आदर्श आहे असे त्याला वाटत नव्हते. आपल्या वर निर्देश केलेल्या ग्रंथात त्याने चर्च आणि राज्य ह्यांमधील परस्परसंबंधांची तपशीलवार चर्चा केलेली आहे. त्यात त्याने असे मत मांडलेले आहे की, मानवी शासकीय कायद्याला ईश्वराच्या राज्याच्या कायद्याचे पालन करणे आवश्यक आहे.

फॅरेल ह्या विचारवंताबरोबर जिनिव्हामध्ये केलेल्या अल्पकालीन वास्तव्यात त्याने जुगार, दारू, नाचगाणे ह्यांवर कडक निर्बंध घालण्याचे प्रयत्न केले. जिनिव्हातील रहिवाशांना अशा कडक निर्बंधांची सवयच नव्हती आणि त्यामुळे दोघांनाही जिनिव्हातून हाकलून देण्यात आले. परंतु काही वर्षांनंतर असे लक्षात आले की, लोकांची नैतिक पातळी फारच खालावलेली आहे. त्यामुळे नगराध्यक्षाने कॅल्व्हिनला जिनिव्हाला परत येण्याचे आमंत्रण दिले. जिनिव्हाला परत आल्यानंतर त्याने चर्चचे कार्य व लोकांची नैतिकता सुधारण्याच्या कार्याला महत्त्वाचे योगदान दिले. आपल्या नियमांची अंमलबजावणी त्याने दयामाया न दाखवता केली. त्याचे नियम समाजाच्या सर्व अंगांना लागू करण्यात आले. त्याने स्वच्छतेसंबंधी कडक नियम केले. नवीन उद्योगधंदे व जिनिव्हा अकादमी स्थापनेसाठी आर्थिक मदत देण्यासाठी त्याने नगरप्रमुखाचे मत अनुकूल केले. त्याच्या कल्पनांचा प्रसार संपूर्ण युरोपभर झाला आणि त्याचे विचार स्कॉटलंडपर्यंत पोचले.

मिचेलेड ह्या विचारवंताने त्या काळच्या विचार-प्रवाहाच्या गाभ्याच्या आणखी एका पैलूवर प्रकाश टाकलेला आहे. त्याच्या दृष्टीने चिंतनात्मक विचार महत्त्वाचा असतो. त्याचा धर्मसुधारणेच्या चळवळीवर विश्वास नव्हता. आजूबाजूला एवढ्या खळबळजनक घटना घडत असतानाही तो कॅथलिकच राहिला. धर्माविषयी आजूबाजूला एवढी चर्चा चाललेली असतानाही त्याने सदसद्‌विवेकबुद्धीचे विश्लेषण करून असे मत व्यक्त केले की, सदसद्‌विवेकबुद्धी ही ईश्वर निर्माण करीत नसून तिचे मूळ रूढींमध्ये आहे. माणूस अंगवळणी पडलेल्या गोष्टींचा कधीच त्याग करीत नाही. त्याने व्यक्त केलेले मत असे : 'अनिश्चिततेसारखी निश्चित गोष्ट कोणतीच नाही' आणि 'जी गोष्ट असत्य वाटणार नाही, ती सत्य असून शकणार नाही'. त्याचे हे मत त्या काळच्या संशयवादाचे निर्देशक आहे.

थॉमस मोर आणि जॉन कोले ह्या दोन विचारवंतांवर मानववादी विचारसरणीचा मोठा प्रभाव पडला होता.

थॉमस मोर इरॅस्मसचा जवळचा मित्र होता. त्याने आपल्या 'युटोपिया' ह्या ग्रंथात आदर्श राज्याची कल्पना रंगविलेली आहे. माणसाने प्रयत्न केल्यास पूर्वीपेक्षा आणि सद्यःस्थितीपेक्षा भिन्न अशा आदर्श राज्याची उभारणी करणे शक्य आहे, असा संदेश त्याने ह्या पुस्तकात दिलेला आहे. राजा हा राज्याचा धार्मिक अधिकारीही असावा ह्या आठव्या हेन्रीच्या मागणीला संमती न दिल्यामुळे हेन्रीने त्याचा शिरच्छेद केला. तो पिकोदेला मिरांदोलाचा परम भक्त होता. त्याच्या चरित्राचे त्याने इंग्लिशमध्ये भाषांतर केले आणि त्यामुळे पूर्वग्रहविरहित दृष्टिकोन निर्माण होण्यास आपणास मदत झाली असे त्याने म्हटलेले आहे. त्यामुळे केवळ मानववादाविषयीच नव्हे, तर इतरही विचारप्रवाहांविषयी तो मोकळ्या मनाने विचार करू शकला. पुनरुज्जीवनकालीन विचारसरणीचा त्याच्यावर फार मोठा प्रभाव होता. नैतिक शिक्षण देण्याचे महत्त्वाचे कार्य करणारी संस्था म्हणून इरॅस्मसप्रमाणे त्याचाही चर्चवर विश्वास होता. राजाची कृपा किंवा त्याचा दबाब ह्याचा त्याच्यावर काहीच परिणाम झाला नाही. ह्याचे मुख्य कारण म्हणजे आध्यात्मिक आणि ऐहिक अधिकार एकाच व्यक्तीकडे नसावेत ह्या प्राचीन ख्रिश्चन धर्माच्या परंपरेवर त्याची श्रद्धा होती.

जॉन कोले हा इंग्लंडमधील मानवावादी विचारवंत. व्हॅलाकडे शिक्षण घेण्यासाठी तो इटलीला गेलेला होता परंतु व्हॅलाचे चर्च आणि धर्म ह्यांवर टीका करणारे

विचार त्याला पटले नाहीत. परंतु त्याच्या ह्यानंतरच्या विचारसरणीवर मानववादी विचारांचा फार मोठा परिणाम झाला. त्याने मठप्रणीत तत्त्वज्ञान आणि नवपाखंडवादी मानववाद ह्या दोहोंवर टीका केली. नवीन शैक्षणिक पद्धतींचा ग्रंथांचा अचूक अर्थ लावण्यासाठी उपयोग करणारा कोले हा पहिला विचारवंत. त्याने 'सेंट पॉल स्कूल'ची स्थापना केली. तो ह्या स्कूलचा डीन होता. ह्या शाळेचा मुख्य उद्देश म्हणजे ग्रीक व लॅटिन ह्या दोनही भाषांतील उत्तम वाङ्मयाचा मुलांना परिचय करून देणे. त्याच्याकडे ईश्वरशास्त्रातील पदवी नव्हती. पॉलच्या पत्रव्यवहारा (Pauline epistles) वर व्याख्याने देताना ग्रंथातील रूपकांचा अर्थ लावण्यासाठी तो त्यांचे शब्दशः विवरण करीत असे. इतरांनी ह्याकडे दुर्लक्ष केले होते. त्याच्या शिकविण्याच्या पद्धतीवर लोक खूष होते आणि त्यामुळे त्याच्या अनुयायांची संख्या बरीच वाढली. त्याला शिक्षणाबद्दल एवढे प्रेम होते की, आपल्याला मिळालेली संपत्ती त्याने 'सेंट पॉल स्कूल' च्या उभारणीसाठी खर्च केली. त्याचे हे कार्य आदर्श मानून अनेकांनी वाङ्मयीन चळवळीत भाग घेतला.

वर उल्लेख केलेले सर्व विचारवंत हे धर्मसुधारणावादी होते. धर्मसुधारणेची चळवळ ही मूलतः धार्मिक चळवळ होती. असे असताना ही मंडळी कोणत्या अर्थाने मानववादी होती? ह्याआधी सांगितल्याप्रमाणे ह्या विचारवंतांना ख्रिश्चन मानववादी असे म्हणता येईल; कारण त्यांनी चर्चचा अधिकार नाकारला तरी त्यांची बायबलवर श्रद्धा होती. पुनरुज्जीवन कालखंडातील विचारवंतांनी पोप आणि संन्यासी ह्यांवर टीका केली; परंतु ते चर्चशी प्रामाणिक होते. आपले चर्चविरुद्धचे ९५ सिद्धान्त विटनबर्ग येथील चर्चच्या दरवाजावर चिकटविणाऱ्या मार्टिन ल्यूथरने संपूर्ण वातावरण ढवळून काढले. जनतेने त्याच्या ह्या संदेशांचे उत्स्फूर्तपणे स्वागत केले आणि चर्चविरुद्धच्या बंडाची लाट संपूर्ण युरोपभर पसरली. अर्थात धर्मसुधारणावादी मंडळींमध्ये एकमत नव्हते, हे ह्याआधी नमूद केलेलेच आहे. ल्यूथर, झिंगली आणि कॅल्व्हिन हे बंडखोर वृत्तीचे कार्यकर्ते होते. इरॅस्मस, थॉमस मोर आणि जॉन कोले ह्यांचे वाङ्मयाबद्दलचे प्रेम, भाषा आणि भाषाशैली ह्यांबद्दलची संवेदनाक्षमता ह्यामुळे मानववादी विचारधारेशी अधिक जवळीक होती. धर्मग्रंथावर विश्वास ठेवण्यापूर्वी त्यांचा योग्य अर्थ लावणे आवश्यक आहे, अशी त्यांची धारणा होती. धार्मिक ग्रंथाच्या अर्थविवरणाच्या कार्यास ह्या तिघांचेही महत्त्वाचे योगदान आहे.

धर्माची त्याच्या विकृत आविष्कारांपासून मुक्तता करणे हा ह्या सर्वांचाच उद्देश होता आणि 'मुक्त विचार' ही पुनरुज्जीवनकालीन विचारप्रणाली त्यांचा आदर्श असल्यामुळेच त्यांना मानववादी विचारवंत म्हणणे उचित ठरेल.

ह्या संदर्भात लक्षात घेण्यासारखा मुद्दा म्हणजे पुनरुज्जीवनकालीन बहुतेक विद्वान आणि धर्मसुधारणावादी मंडळी ह्यांपैकी कोणीच वैज्ञानिक प्रवृत्तीला प्रोत्साहन दिले नाही. वास्तविक पाहता वैज्ञानिक प्रगतीमुळे त्यांचा फायदा झाला होता. मुद्रणकलेचा शोध लागला नसता, तर धर्मसुधारणेची चळवळ संपूर्ण युरोपभर पसरणे शक्य नव्हते. काही वैज्ञानिक शोध बायबलविरोधी आहेत, हे लक्षात आल्यावर काहींनी विज्ञानाला विरोधही केला. ल्यूथरने कोपरनिकसच्या Revolution of the Celestial Orbs वर टीका केलेली होती. धर्मसुधारणावादी ख्रिश्चन मानववादात आपणास परस्परविरोधी प्रवृत्तीचे मिश्रण आढळते. ह्यामुळे मानवी दृष्टिकोन समृद्ध होण्यास मदतच झाली.

थॉमस ॲक्वायनास ह्या तत्त्ववेत्याने तत्त्वज्ञान आणि ईश्वरशास्त्र ह्यांत भेद केला. दैवी कृपेच्या जीवनाला बुद्धीमुळे आवश्यक ते अधिष्ठान मिळते, असे त्याचे मत होते. मानवी बुद्धीला तिचे स्वतःचे असे खास मूल्य आहे आणि ते दैवी कृपेवर अवलंबून नाही. मध्ययुगीन विचारवंतांच्या मते दैवी कृपा मूळ मानवी स्वभाव नष्ट करीत नाही, तर त्याला पूर्णता देते. परंतु अशी पूर्णता मिळवण्यासाठी मूळ स्वभावात पूर्णतेचे काही अंश आणि समतोल असणे आवश्यक आहे. ईश्वरी कृपा मानवातील सुप्त शक्तींचा विकास करते.

ख्रिश्चन मानववादाचा आधुनिक आविष्कार १९३० च्या आसपास 'सोशालिस्ट पॉप्युलर फ्रंट' च्या माध्यमातून झालेला आढळतो. जॅक्स मॅरिटन हा त्याचा नेता होता. त्याने पुनरुज्जीवनवादावर 'व्यक्तिकेंद्रितते'चा आरोप केला.








मानवी स्वातंत्र्याचा पुरस्कार करताना मानवाचा ईश्वराशी असलेला संबंध नाकारला तरी ख्रिश्चन मानववाद ईश्वरकेंद्रित आहे, ईश्वराशी असलेल्या संबंधामुळेच माणसाचा खरा विकास होतो, असे मत त्यांनी मांडले.

धर्मनिरपेक्ष मानववादाचे काही पुरस्कर्ते स्वतःला धार्मिक म्हणवून घेतात. मानववादाच्या दोन जाहीरनाम्यांमधून ही गोष्ट स्पष्ट होते. १९३३ मध्ये प्रसिद्ध झालेल्या मानववादी जाहीरनाम्याम धर्माचे प्रयोजन सांगताना असे म्हटले आहे, की धर्म म्हणजे 'चांगल्या जीवनाचा सामूहिक शोध' आहे. सामाजिक सुधारणा हे धर्माचे प्रमुख कार्य आहे. १९५३ मध्ये दुसरा मानववादी जाहीरनामा प्रसिद्ध केला गेला. त्याच्या लेखकांनी स्वतःला 'धार्मिक मानववादी' असे म्हटलेले आहे. ह्या जाहीरनाम्यातील सर्व तत्त्वे धर्मनिरपेक्ष आहेत. परंतु ह्या लेखकांचा असा दावा आहे, की ही तत्त्वे धार्मिक सत्यांप्रमाणेच अंतिम दृष्ट्या सत्य आहेत. त्यांच्या ह्या भूमिकेमुळेच अहर्नफिल्ड आणि टी. एस्. इलियट ह्या टीकाकारांचा ह्या मंडळींवर रोष आहे. धर्माला हद्दपार करून मानववाद धर्माची जागा स्वतः घेऊ पाहत आहे. अनुभववादाचे अधिष्ठान असलेले उपयुक्ततावाद आणि निसर्गवादसुद्धा धर्माबरोबर शांततामय सहकार्य करताना आढळतात. फक्त वैज्ञानिक मानववादाने जीवनाच्या सर्व अंगांचे वैज्ञानिक पद्धतीने विश्लेषण करून धर्म पूर्णपणे बाजूला सारला. धर्माला पूर्णपणे नाकारणे हे अनुभववाद्यांच्या दृष्टीने अटळ आहे. त्यांनी स्वीकारलेल्या तत्त्वज्ञानीय भूमिकेचा तो आवश्यक असा निष्कर्ष आहे.



अनुक्रमणिका

# स्वतंत्र विदर्भ राज्याच्या चळवळीस जनतेचा प्रतिसाद

माधव चोले

स्वतंत्र विदर्भ राज्याची मागणी ही ब्रिटिश काळापासून चालू आहे. जवळपास १०८ वर्षे जुनी ही मागणी आहे. मराठी एकभाषिक असतानासुद्धा प्रादेशिक विकासाचा असमतोल, पश्चिम महाराष्ट्रवाद्यांचे विदर्भाकडे दुर्लक्ष करून पश्चिम महाराष्ट्राकडे विकासनिधी पळविणे याला विरोध करण्यासाठी आणि विदर्भाचे प्राचीन काळापासून असलेले वैभव परत प्राप्त करण्यासाठी स्वतंत्र विदर्भ राज्याची मागणी सातत्याने लावून धरली जाते; विशेषतः केंद्र सरकारने एखादे नवीन राज्य निर्माण केले की, जसे रालोआच्या काळात तीन नवीन राज्यांची निर्मिती आणि वारंवार होणाऱ्या तेलंगणाच्या आंदोलनाची तीव्रता लक्षात घेऊन स्वतंत्र विदर्भाचेही आंदोलन झालेले आहे. पण विदर्भ राज्याच्या आंदोलनावर अशी टीका केली जाते की, हे आंदोलन विदर्भवादी जनतेचे नाही. मूठभर बुद्धिजीवी अभ्यासकांचे आहे, अमराठी लोकांचे आहे; त्याला जनतेचा पाठिंबा नाही. अर्थात या चळवळीला जनतेचा ख़रोखरच पाठिंबा नाही का? त्याला राजकीय पक्षांच्या दुटप्पी भूमिका कारणीभूत आहेत किंवा स्वतंत्र राज्य चळवळीला जनतेचा पाठिंबा नसल्याकारणाने राजकीय पक्ष दुटप्पी भुमिका घेतात, याचा अभ्यास प्रस्तुत शोधनिबंधामध्ये करण्यात आलेला आहे.

येथे आपण स्वतंत्र विदर्भ राज्याच्या चळवळीस जनतेच्या पाठिंब्याचा प्रतिसाद कशा स्वरूपाचा आहे, याचा अभ्यास करणार आहोत. चळवळीतील जनतेचा प्रतिसाद हा तीन निकषांवर ठरविता येईल. एक म्हणजे चळवळीतील लोकांचा सहभाग. त्यात ही चळवळ ज्या संस्था, संघटना आणि पक्षांनी चालविली, त्यांतल्या लोकांचा सहभाग कसा आहे. दुसरा निकष म्हणजे स्वतंत्र विदर्भ राज्याच्या मुद्द्यावर राजकीय पक्षांना आलेले यश/अपयश. तिसरा निकष चळवळ ही सामाजिक-सांस्कृतिक झाली का नाही, यावरही जनतेचा प्रतिसाद ठरविता येईल.

**आंदोलनातील लोकांचा सहभाग :**

बॅ. रामराव देशमुखांच्या अध्यक्षतेखाली १८ ऑगस्ट १९४० रोजी 'महाविदर्भ सभा' स्थापन करून मध्यप्रांतातून मराठी भाषिक ८ जिल्ह्यांचे 'नागाविदर्भ' किंवा 'महाविदर्भ' स्वतंत्र राज्य करावे यासाठी बापूजी अणे, ब्रिजलाल बियाणी, जमनालाल बजाज, राजे विश्वेश्वरया, टी. जी. देशमुख, बाबुराव हरकरे, जनरल आवारी या काँग्रेस नेत्यांनी विदर्भाचे आंदोलन मोठ्या प्रमाणात चालविले होते. त्या वेळी लोकांनीही पाठिंबा दिला होता. [१]

केंद्र सरकारचा देशात भाषिक राज्यरचनेचा प्रयत्न चालू होता. महाराष्ट्रातही संमपने मुंबई, विदर्भासकट मराठी भाषिकांचे आंदोलन सुरू केले होते. विदर्भातील काँग्रेसमध्ये दोन गट पडले होते. एक गट संयुक्त महाराष्ट्रात सामील व्हावे यासाठी तर दुसरा गट स्वतंत्र विदर्भ राज्य व्हावे, यासाठी प्रयत्नशील होता. त्यासाठी त्या गटाने विदर्भात व्यापक आंदोलनही केले होते. त्यात बापूजी अणे, बियाणी, कन्नमवार, जांबुवंतराव धोटे यांचा सहभाग होता. या आंदोलनाला ठिकठिकाणी उत्स्फूर्त पाठिंबा मिळाला होता. [२] पण विदर्भातूनच संयुक्त महाराष्ट्रात सामील होण्यास मोठ्या प्रमाणात पाठिंबा मिळाल्याने चळवळीवर मर्यादा पडल्या होत्या.

केंद्रीय काँग्रेस नेत्यांनी विदर्भासकट महाराष्ट्र राज्याची निर्मिती केल्यानंतर विदर्भातील नेत्यांनी काँग्रेसच्या धोरणाला विरोध करण्यासाठी 'नागाविदर्भ समिती' मार्फत लोकनायक बापूजी आणे, विदर्भकेसरी ब्रिजलाल बियाणी, वीर बाबुराव हरकरे, जनरल मंचरशा आवारी, भाई मुखरे, राजे लालश्याम शहा, राजे विश्वेश्वरया यांनी स्वतंत्र विदर्भासाठी आंदोलन केले, तर 'महाविदर्भ राज्य संघर्ष समिती' तर्फे तत्कालीन विदर्भवीर जांबुवंतराव धोटे यांनी विदर्भ राज्यासाठी प्रखर आंदोलन छेडले. बंद,








मोर्चे, धरणे इत्यादींमुळे आंदोलन व्यापक झाले. आंदोलक आणि पोलिसात चकमकी झाल्या. [३]

१९६० नंतर विदर्भ राज्याची चळवळ प्रभावहीन झाली; कारण यशवंतरावांनी विदर्भवाद्यांना विधिमंडळात भरगच्च आश्वासन तर दिलेच; पण त्याचबरोबर विदर्भवाद्यांना मंत्रिमंडळात सहभागी करून एकमुखी प्रभुत्वाचे राजकारण केले.

इंदिरा गांधींच्या काळात (१९७० ते ८५) जांबुवंतराव धोटे यांनी आपल्या सहकारी कार्यकर्त्यांसह आंदोलन तीव्र केले. हे आंदोलन विदर्भाच्या कानाकोपऱ्यांपर्यंत जाऊन पोचले. त्या वेळी त्यांनी विदर्भ राज्य समितीचे १२ आमदार निवडून आणले होते. त्या वेळचे मुख्यमंत्री वसंतराव नाईक या आंदोलनाने भयभीत झालेले होते. कारण आंदोलनाची तीव्रता वाढलेली होती. त्या वेळच्या नागपूर अधिवेशनात धोटेंनी कापसांनी भरलेल्या १० ते १२ बैलगाड्या थेट आंदोलन करत विधानभवनात आणल्या होत्या. त्यांनी अनेक ठिकाणी सभा, बैठका घेऊन, मोर्चे काढले होते. या त्यांच्या मोर्चाला जनतेने उत्स्फूर्त पाठिंबा दिला होता. मात्र इंदिरा गांधी नागपूरला आल्या आणि त्यांनी जांबुवंतरावांना नागपूर लोकसभेची जागा बहाल केली. जांबुवंतराव १२ आमदार व आपल्या फॉरवर्ड ब्लॉक पक्षासह १९७८ मध्ये इंदिरा काँग्रेसमध्ये विलीन झाले. त्यामुळे आंदोलनाचा जोर ओसरला. [४]

युतीसरकारच्या काळात काँग्रेसच्या विदर्भवादी नेत्यांनी युतीसरकारला अडचणीत आणण्यासाठी स्वतंत्र विदर्भ राज्याची चळवळ सुरू केली. सतीश चतुर्वेदींनी २ ऑक्टोबर १९९६ रोजी स्वतंत्र्य विदर्भ राज्य संकल्प दिन पाळला. याला 'विदर्भ माथाडी कामगार संघ', व 'विदर्भ विकास संघर्ष समिती'ने पाठिंबा दिला. विदर्भ राज्य काँग्रेस कृती समितीने मेळावे आयोजित करून सरकारवर दबाव आणला होता. पण काँग्रेसचे हे आंदोलन फक्त कार्यकर्त्यांपर्यंत सीमित राहिले. सर्वसामान्य जनतेपर्यंत पोचले नाही. [५]

रालोआ सरकारने तीन नवीन राज्यांची निर्मिती केल्यावर विदर्भात विदर्भ राज्य चळवळीने पुन्हा जोर धरला. १५ नोव्हेंबर २००० रोज़ी लोकजागृती घडवून आणण्यासाठी 'विदर्भ राज्य संघर्ष समिती', 'विदर्भ राज्य गणपरिषद' आणि 'विदर्भ मुक्ती मोर्चा' इत्यादी विदर्भवादी समित्यांद्वारे विदर्भ निर्धार यात्रा काढण्यात आली. ही यात्रा पूर्ण विदर्भात फिरली. तिला ठिकठिकाणी जनतेने पाठिंबा दिला २७ नोव्हेंबर २००० रोजी विदर्भ राज्य संघर्ष समितीच्या वतीने विदर्भ बंदचे आव्हान करण्यात आले. या बंदला शिवसेना, डाव्या पक्षांचा अपवाद वगळता भाजपा, स्वतंत्र भारत पक्ष, भारिप बहुजन महासंघ, विदर्भ काँग्रेस समिती, राष्ट्रवादी काँग्रेस, नागाविदर्भ समिती इत्यादींनी पाठिंबा दिला; तसेच २५० व्यापारी संस्थांनीही पाठिंबा दिला. पण या चळवळीचे लोण खेड्यापाड्यांतील सर्वसामान्य जनतेपर्यंत आलेले नव्हते. [६]

**विदर्भ बंद : (२० जानेवारी २०१०)**

तेलंगणापाठोपाठ विदर्भातही सर्वपक्षीय नेत्यांनी २० जानेवारी २०१० रोजी 'विदर्भ बंद' पुकारला होता. त्यासाठी 'विदर्भ राज्य संघर्ष समिती' स्थापन करण्यात आली. या बंदला शिवसेना, मनसे आणि डावे वगळता सर्व पक्षांनी पाठिंबा दिला. हा बंद ठिकठिकाणी फलक लावून पाळण्यात आला. शाळा, महाविद्यालये, सरकारी कार्यालये व्यापार, वाहतूक बंद होती. आतापर्यंत अशा प्रकारचा व्यापक बंद विदर्भात झालेला नव्हता. हा बंद हाणून पाडण्याचा प्रयत्न शिवसेनेने मेळावे घेऊन केला. पण तो यशस्वी झालेला नाही. शिवसेनेचे स्थानिक नेते संजय राठोड, भावना गवळी गुपचूप राहिले. [७]

३१ जुलै २०१३ रोजी केंद्र सरकारने तेलंगणा राज्याची घोषणा केल्यानंतर पुन्हा विदर्भात विदर्भ राज्याचे आंदोलन सुरू झाले. या वेळी मात्र सर्व पक्षांनी एकत्र येऊन आंदोलन न करता आपापल्या पक्षीय स्तरावर पक्षश्रेष्ठींना भेटणे, लेखी पत्र देणे असे उपक्रम राबविले. पण केंद्रातल्या सत्ताधारी आणि विरोधी पक्षांनी विदर्भ मुद्द्यावर बोलण्याचे टाळले; अर्थात दुर्लक्ष केले.

VJAC ने ५ ऑगस्ट २०१३ रोजी जंतर-मंतर (दिल्ली) येथे स्वतंत्र विदर्भ राज्यासाठी धरणे धरले होते. यात विदर्भसमर्थक कार्यकर्त्यांनी सहभाग घेतला होता. बोडोलँड पीपल्स फ्रंटचे खासदार एस. के. बैसिमुथियारी यांनीही पाठिंबा दिला; तसेच अरविंद केजरीवाल यांच्या आम आदमी पार्टीनेही सहभाग घेऊन

पाठिंबा दिला. या वेळी विदर्भातील केंद्रातल्या कोणत्याही पक्षाच्या नेत्यांनी आंदोलकांची भेट घेतली नाही. त्यामुळे आंदोलक नाराज झालेले होते. [८]

२८ सप्टेंबर २०१३ रोजी VJAC ने नागपूर येथे नागपूर कराराची होळी केली आणि रस्ता रोको केला. यात शेकडो विदर्भ कार्यकर्त्यांनी भाग घेतला होता. [९] तसेच २८ सप्टेंबर २०१३ रोजी काँग्रेसच्या डॉ. आशिष देशमुख यांनी 'विदर्भ संघर्ष यात्रा' काढली. यात महाविद्यालयीन विद्यार्थ्यांनी सहभाग घेतला. पण या यात्रेला व्यापक स्वरूप प्राप्त झालेले नाही.

२००३ साली सकाळ वर्तमानपत्राच्या नागपूर आवृत्तीने विदर्भ राज्याच्या पाठिंब्याचे स्वरूप जाणून घेण्यासाठी एक सर्वेक्षण केले. सर्वेक्षणात नगरपरिषद अध्यक्ष, जिल्हा परिषद अध्यक्ष, विधानसभा व विधानपरिषद सदस्य आणि खासदार तसेच याअगोदर निवडून आलेल्या जनप्रतिनिधींना एकच प्रश्न विचारला तो असा – विकासासाठी तुम्हाला स्वतंत्र विदर्भ राज्य हवे काय? सर्वेक्षणाचा निकाल पूर्णपणे विदर्भाच्या बाजूने लागला होता. [१०]

**पृथक् विदर्भासाठी अमरावतीत जनमत चाचणी :**

'विदर्भ माझा' तसेच येथील समाजकार्य महाविद्यालयातर्फेही जनमत चाचणी घेण्यात आली. या चाचणीत १२८ मतपेट्यांतून ७२ हजार ५९८ इतके मतदान झाले. यांपैकी स्वतंत्र विदर्भाच्या बाजूने होय म्हणणारे ६१ हजार ६७५ (८५%) तर नाही म्हणणारे ९ हजार २३६ इतके (१२%) होते. अवैध मते एक हजार ६५८ झालेली होती. यावरून अमरावतीकरांचा कौल स्वतंत्र विदर्भाच्या बाजूने होता. [११] वरील दोन्ही जनमत चाचण्यांत स्वतंत्र विदर्भाच्या बाजूने जनतेने कौल दिला आहे; पण आंदोलनातील लोकांचा मर्यादित सहभाग, निवडणुकीत विदर्भवादी पक्षांचे अपयश याचे उत्तर कुठे शोधायचे, हा प्रश्न पडतो. विदर्भवादी चळवळीचे जनचळवळीत रूपांतर झाल्याचे दिसत नाही.

स्वतंत्र विदर्भ राज्याचे आंदोलन हे १०८ वर्षांपासून चालू आहे तरी त्याचे रूपांतर जनचळवळीत झालेले नाही, ही वस्तुस्थिती आहे. सुरुवातीच्या काळात लोकनायक बापूजी अणे, ब्रिजलाल बियाणी आणि जांबुवंतराव धोटे यांचा अपवाद वगळता स्वतंत्र विदर्भासाठी अन्य नेत्यांनी केलेल्या आंदोलनाला स्थानिक जनतेने फारसा पाठिंबा दिला नाही. त्यामुळे स्वतंत्र विदर्भ राज्याचे आंदोलन लोकांचा चळवळीतील सहभाग आणि निवडणुका या दोन निकषांवर यशस्वी झालेले नाही. याचे कारण म्हणजे विदर्भवादी नेत्यांत एकमताचा अभाव आणि विदर्भातील नेत्यांचे सत्तेसाठी राजकारण. त्यामुळे नेत्यांनी ध्यास धरून ही चळवळ जनसामान्यांपर्यंत नेली नाही. नंतरच्या काळात तर विदर्भ राज्याचा मुद्दा पत्रव्यवहार, मंडळ घेऊन वरिष्ठांना भेटणे, बैठका घेणे असा सीमित झालेला आहे. धोटेंनी तर भर सभेत आता पुरे झाले विदर्भाचे आंदोलन असे म्हटले. त्यामुळे विदर्भ राज्याचे आंदोलन हे कमकुवत झालेले आहे, हे लक्षात घ्यावे लागेल.

**निवडणुकीतील पक्षांचे यश/अपयश :**

स्वतंत्र विदर्भ राज्याच्या मुद्द्यावर राष्ट्रीय पक्षांना निवडणुकीत आलेले यश/अपयश, स्वतंत्र विदर्भाच्या मुद्द्यावर जनप्रतिनिधींनी दिलेले राजीनामे आणि विदर्भाच्या मुद्द्यावर पक्षांतर यावरून आंदोलनाला लोकांचा पाठिंबा आहे की नाही, हे ठरविता येते.

स्वतंत्र विदर्भसमर्थक राजकीय पक्षांत महाविदर्भ राज्य संघर्ष समिती, विदर्भ समाजवादी फोरम, विदर्भ नवनिर्माण सेना यांचा समावेश होतो. या पक्षांनी संपूर्ण विदर्भातील जागा कधीच लढविल्या नाहीत. ज्या काही लढविल्या, त्या जागेवरील उमेदवारांच्या अनामत रकमा जप्त झाल्या आहेत. अपवादाने एक-दोन जागा, विशेषत: चंद्रपूरमध्ये मिळालेल्या आहेत. स्वतंत्र विदर्भाच्या मुद्द्यावर निवडणुका लढवून अपयश आल्याने काही नेत्यांनी काँग्रेसमध्ये प्रवेश केलेला आहे. उदा., वसंतराव साठे (पक्ष– प्रजा समाजवादी पक्ष). यावरून स्वतंत्र विदर्भ-समर्थक पक्षांना लोकांनी नाकारलेले आहे, हे लक्षात येते.

विदर्भ राज्याच्या मुद्द्यावर फार तुरळक नेत्यांनाच विजय मिळालेला आहे. लोकनायक बापूजी अणे यांनी १९६२ ची लोकसभा निवडणूक 'विदर्भ आंदोलन समिती'चे उमेदवार म्हणून लढविली. त्यांनी या निवडणुकीत काँग्रेसच्या रिखबचंद्र शर्मांचा पराभव केला. पुढे १९६७






मध्ये लोकसभेच्या निवडणुकीत काँग्रेसच्या नरेंद्र देवघरे यांनी त्यांचा पराभव केला होता. नंतर त्यांनी काँग्रेसमध्ये राहूनच स्वतंत्र विदर्भाचे आंदोलन चालविले होते.

टी. जी. देशमुख यांनी 'नागा-विदर्भ आंदोलन समिती' स्थापन करून नागपूरच्या स्थानिक राजकारणात विदर्भाचा मुद्दा घेऊन महानगरपालिकेच्या निवडणुका लढविल्या. अपक्ष आणि भाजपाच्या सहकार्याने ते महापौरही झाले होते. त्यांनी नंतर काँग्रेसनिष्ठ राहून विदर्भ राज्याचा मुद्दा हाताळला होता. [१२]

स्वतंत्र विदर्भाच्या मुद्द्यावर राजे विश्वेश्वररया हे १९५७ ते १९७७ अशी २० वर्षे सतत आमदार म्हणून चंद्रपूरमधून निवडून आलेले होते. पुढे १९७७ साली चंद्रपूर लोकसभा मतदारसंघातून विजयी झाले होते. पण त्यांना स्वतंत्र विदर्भाच्या मुद्द्यावर लोकचळवळ उभी करता आलेली नाही.

जांबुवंतराव धोटे यांनी स्वतंत्र विदर्भाच्या मुद्द्यावर फॉरवर्ड ब्लॉक पक्षाचे उमेदवार म्हणून १९७१ ला नागपूर मतदारसंघातून काँग्रेसच्या रिखबचंद शर्मांचा पराभव केला होता. पण तेही नंतर १९७८ मध्ये आपला पक्ष आणि कार्यकर्त्यांसह इंदिरा काँग्रेसमध्ये गेले. १९८४ ला काँग्रेसमधून बाहेर पडले. आता परत फॉरवर्ड ब्लॉक पक्षामध्ये आहेत. पण २६ मार्च २०१३ रोजी एका कार्यक्रमात पुरे झाले विदर्भ राज्याचे आंदोलन, असे म्हणून त्यांनी माघार घेतलेली आहे.

१९८० नंतर विदर्भाची चळवळ थंडावलेली दिसते. १९९५ ची निवडणूक भाजपाने स्वतंत्र विदर्भाच्या मुद्द्यावर लढविली. ते जिंकलेही. सत्ताही प्राप्त झाली. पण युतीतील शिवसेनेने विदर्भ राज्याला आडकाठी घातली आणि भाजपानेही या मुद्द्यावर संदिग्ध भूमिका घेतली. [१३]

तेलंगणामध्ये TDP काँग्रेस तसेच भाजपातील आमदार, खासदारांनी आपल्या पक्षांची तेलंगणा राज्याविषयी संदिग्ध भूमिका असल्याने (TRS) मध्ये पक्षांतर केलेले आहे. तसे विदर्भात झालेले नाही. उलट, स्वतंत्र विदर्भ राज्याच्या मुद्द्यावर वारंवार निवडणुकीत पराभव झाल्याने काँग्रेसमध्ये नेत्यांनी पक्षांतर केलेले आहे, ही बाब लक्षात घ्यावी लागेल.

१९५७ ला फक्त एकदा स्वतंत्र विदर्भ राज्यासाठी मा. स. कन्नमवारांकडे विदर्भातील ५४ आमदारांनी राजीनामे दिलेले होते. पण श्रेष्ठींचे ऐकून कन्नमवारांनी माघार घेतलेली होती. त्यानंतरच्या इतिहासात स्वतंत्र विदर्भाच्या मुद्द्यावर कोणत्याही नेत्यांनी आपल्या पदाचा राजीनामा दिलेला नाही. यावरून निवडणुकांच्या राजकारणात विदर्भाच्या मुद्द्यावर (काही एक-दोन जागांचा अपवाद वगळता). कोणत्याही पक्षाला यश आलेले नाही.

**सामाजिक सांस्कृतिक आधार :**

तेलंगणामध्ये पारंपरिक लोकमाध्यमे आणि इलेक्ट्रॉनिक माध्यमांतून, आंध्रातील विकासाचा असमतोल आणि तेलंगणावरील अन्याय हे प्रत्येक हृदयापर्यंत आणि झोपडीपर्यंत पोचवले. त्यामुळे ही जनचळवळ झालेली होती. तिचे श्रेय साहित्यिक, सांस्कृतिक, कायदेविषयक, सामाजिक-सांस्कृतिक संघटना व राजकीय पक्षांना जाते. तसेच तेलंगणा धूम-धाम या सांस्कृतिक मंचामार्फत गायक, कलाकार, कवी, नर्तक यांनी आपल्या वेगवेगळ्या कलाप्रकारांतुन आंध्राद्वारे तेलंगणाचे कसे शोषण केले जाते, यांची मांडणी गावो-गावी जाऊन केली. त्याचप्रमाणे तेलंगणा सण, उत्सव आणि यात्रांचाही वापर करण्यात आला. त्यामुळे तेलंगणा ही जनचळवळ झालेली होती. त्यासोबत विदर्भाची तुलना करताना विदर्भात कोणत्याच पक्षाने विदर्भ विकासाची आघाडी करून हा प्रश्न मनःपूर्वक धसास लावण्याचे मनावर घेतलेले नाही. लोकनायक अणे आणि ब्रिजलाल बियाणी यांच्यानंतर जांबुवंतराव धोटे सोडले तर वैदर्भीय जनतेने विदर्भभावनेने अन्य कोणत्याही लोकनेत्यावर विश्वास ठेवला नाही. चळवळीला लोकभावनेची जोड पाहिजे असते. लोकभावना जागृत होण्यासाठी लोकसाहित्य, कला, संस्कृती, सण, उत्सव, यात्रा यांच्या माध्यमाची जोड देऊन चळवळ करावी लागते. तशी विदर्भ राज्याची चळवळ झालेली नाही. विदर्भचळवळ ही नेते, कार्यकर्ते आणि विधिमंडळ अधिवेशनापुरती मर्यादित राहिली आहे. खरा प्रश्न आहे विदर्भवासीयांच्या विकासाचा, रोजगारांचा. त्यासाठी सर्व पक्षीयांनी विकास आघाडी करून लढा देणे आवश्यक आहे. [१४]

**संदर्भसूची :**

१. सुहास कुलकर्णी, मिलिंद चंपानेरकर, २६ फेब्रुवारी २०१३, असा घडला भारत, विदर्भ प्रश्न व नागपूर करार, रोहन प्रकाशन, पुणे, पृष्ठ – १९८.

२. पूर्वोक्त, पृष्ठ – १९८.

३. अनिल वासनिक, १४ ऑक्टोबर २०१०, विदर्भ राज्य : वास्तव आणि विपर्यास, नागपूर, पृष्ठ – १६.

४. बबन लाव्हात्रे, ६ डिसेंबर २०१२, विदर्भ राज्याचे खच्चीकरण, प्रबुद्ध प्रकाशन, नागपूर, पृष्ठ –७०, ७१.

५. हेमंत कडुकर, २००६, विदर्भाचे मागासलेपण : वि. वै. विकास मंडळाची भूमिका, राज्यशास्त्र व लोक प्रशासन विभाग पुणे विद्यापीठ, पुणे, अप्रकाशित (M.Phil.) प्रबंध.

६. पूर्वोक्त.

७. दैनिक लोकमत, २१ जानेवारी २०१०, नागपूर, पृष्ठ - १.

८. दैनिक लोकसत्ता, ६ ऑगस्ट २०१३, मुंबई.

९. दैनिक सकाळ, २९ सप्टेंबर २०१३, मुंबई.

१०. सकाळ, ४ ऑक्टोबर २०१३, दैनिक सकाळच्या सर्वेक्षणाचा धक्कादायक निष्कर्ष, नागपूर.

११. दैनिक सकाळ, १२ ऑक्टोबर २०१३, अमरावती, पृष्ठ – ३.

१२. मदन धनकर, १४ ऑगस्ट २०१०, विदर्भ राज्यवादी नेतृत्व, विदर्भाला सुखी करा, साधना, पुणे, पृष्ठे – ६४, ६५, ६६, ६७, ६८.

१३. मोरेश्वर बडगे, एप्रिल २०१३, विदर्भ राज्य मागणारे थकले, दै. लोकमत, औरंगाबाद.

१४. डॉ. श्रीपाद भालचंद्र जोशी, ४ जानेवारी २०१३, वेगळा विदर्भ का अखंड महाराष्ट्र? एका वादाची सद्यःस्थिती, ग्रंथाली प्रकाशन, मुंबई, पृष्ठे – १६०, १६१.

❧❧❧

---








ग्रंथवेध :

# एका इतिहास-पंडिताची हकिकत

श्री. मा. भावे

सुमारे पन्नास-पंचावन्न वर्षांपूर्वी (मी महाविद्यालयात विद्यार्थी असताना) आर्नोल्ड जे. टॉयन्बी आणि त्याचा महाग्रंथ 'ए स्टडी ऑफ हिस्टरी' यांची नावे मोठ्या आदराने व काहीशा आढ्यतेने घेतली जायची. 'ए स्टडी ऑफ हिस्टरी' हा दहा खंडांत लिहिलेला जबरदस्त ग्रंथ होता. तो (त्या वेळी व आताही) कोणी संपूर्ण वाचला असेल अशी शक्यता फारच थोडी होती. पुस्तक न वाचताही 'मी ते वाचले आहे' असे सांगण्याचा मोह व्हावा, अशा पुस्तकांपैकी 'ए स्टडी ऑफ हिस्टरी' हे पुस्तक होते. असे वलय लाभलेल्या पुस्तकाचा लेखक मातब्बरच असणार. म्हणून लेखक व पुस्तक या दोन्हींची नावे दबकत घेतली जायची. आढ्यता यासाठी असे की, या दोघांची माहिती समोरच्याला नाही, अशी खात्री बोलणाऱ्याला वाटत असे.

टॉयन्बीचा हा टोलेजंग ग्रंथ तीन हप्त्यांत लिहिला गेला व प्रसिद्ध झाला. पहिले तीन खंड १९३४ साली, नंतरचे तीन खंड १९३९ साली व शेवटचे चार खंड १९५४ साली प्रसिद्ध झाले. पुढे मूळ ग्रंथाला परिशिष्ट असावे तसे आणखी दोन खंड टॉयन्बीने १९६० च्या आसपास लिहिले. दुसऱ्या हप्त्यानंतर तिसरा हप्ता प्रसिद्ध होईपर्यंत १५ वर्षे गेली, कारण दरम्यान दुसरे महायुद्ध झाले. त्या काळात टॉयन्बीला इंग्लंडच्या परराष्ट्र खात्यात मोठ्या पदावर काम करावे लागले. त्यामुळे ग्रंथासाठी करावा लागणारा अभ्यास व लेखन यांस वेळ मिळाला नाही. हा जो कालखंड गेला, त्यात टॉयन्बीच्या विचारातही मोठा फेरबदल आला. त्यामुळे पहिल्या सहा खंडांतील विचारांचा रोख व नंतरच्या चार खंडांतील प्रतिपादन यांत बरीच तफावत पडली.

टॉयन्बीच्या बड्या ग्रंथाचा अभ्यास सामान्य सुशिक्षित वाचकाच्या आवाक्याबाहेरचाच होता. पहिले सहा खंड प्रसिद्ध झाल्यावर इंग्लंडमधील विद्वानांच्या वर्तुळात त्यांचे उत्तम स्वागत झाले. टॉयन्बीचा दांडगा अभ्यास, तपशिलावरचे त्याचे प्रमुख, इतिहासाला एक सूत्र आहे असे सांगून त्या सूत्रात त्याने केलेली विविध घटनांची गुंफण, त्याची सरळ पण परिणामकारक शैली या गुणांचे योग्य ते कौतुकही झाले. असा हा विद्वज्जड ग्रंथ सामान्य वाचकांपर्यंत पोचेल व अफाट लोकप्रिय होईल, अशी अपेक्षा लेखक वा प्रकाशक यांची नव्हतीच.

डी. सी. सॉमरव्हेल नावाचा एक शिक्षक होता. पहिल्या सहा खंडांतील विवेचन त्याला इतके आवडले की, या सहा खंडांचा सारग्रंथ लिहिण्याची इच्छा त्याने लगेचच व्यक्त केली. हे काम त्याने टॉयन्बीच्या देखरेखीखाली पूर्ण केले व १९४७ च्या मार्च महिन्यात हा सहाशे पानांचा सारग्रंथ इंग्लंडमध्ये व अमेरिकेत प्रसिद्ध झाला. 'ए स्टडी ऑफ हिस्टरी'चे पुढचे चार खंड प्रकाशित झाल्यावर सॉमरव्हेलने (टॉयन्बीच्या देखरेखीखाली) त्यांचाही सारग्रंथ १९५७ साली तयार केला. नंतर १९६० साली या दोन्ही सारग्रंथांचे साडेनऊशे पानांचे एकत्र पुस्तक प्रकाशित झाले.

पहिला सारग्रंथ अतिशय लोकप्रिय झाला. ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेसने त्याच्या प्रसिद्धीची मोठी मोहीमच हाती घेतली होती. अमेरिकेतल्या सर्व नामांकित व दर्जेदार नियतकालिकांतून सारग्रंथावर प्रदीर्घ, अभ्यासपूर्ण व स्तुतिपर लेख आले. अमेरिकेतील प्रतिष्ठित कुटुंबांनी हा सारग्रंथ वाचला असेल किंवा नसेल; पण त्या कुटुंबांच्या चहापात्रांच्या टेबलावर तो ठेवलेला दिसू लागला.

त्या काळी हेन्री ल्यूस नावाच्या धडाडीच्या प्रकाशकाने चालविलेल्या 'टाइम' या साप्ताहिकाचा सर्व इंग्रजी भाषिक जगात अतिशय बोलबाला होता (आजही ते साप्ताहिक चालू आहे; पण त्या काळची त्याची लोकप्रियता उरलेली नाही). आपल्या पुस्तकात (म्हणजे त्याच्या पहिल्या सहा खंडांत) संस्कृतींच्या उदयास्तांच्या चक्राचे टॉयन्बीने केलेले निरूपण ल्यूसला फारच पसंत पडले होते. १७ मार्च १९४७ रोजी 'टाइम'ने टॉयन्बीच्या इतिहासविषयक

अनुक्रमणिका






चिंतनाचा परिपाक सांगणारा विशेषांक प्रसिद्ध केला. अंकाच्या मुखपृष्ठावर जिज्ञासा वाढविणारे चित्र दिले होते. टॉयन्बी भविष्याकडे नजर लावून पाहत आहे; त्याच्या मागील बाजूस एक पर्वत आहे व त्याच्या कड्यावर काही मुनष्याकृती पडतझडत चढत आहेत, असे दाखवले होते. या कडा चढणाऱ्या आकृती म्हणजे उन्नती साधू इच्छिणाऱ्या वेगवेगळ्या संस्कृती होत, असा खुलासा अंकात करण्यात आला होता. या चित्राखाली ठळक अक्षरांतील विधान छापले होते : 'आपल्या संस्कृतीचा विनाश अटळ नाही!'

'टाइम'च्या या अंकाच्या १५ लाख प्रती खपल्या आणि इतिहासाचा गाढा अभ्यासक व मनुष्यजातीच्या भविष्याचा कळकळीने विचार करणारा तत्त्वज्ञानी म्हणून टॉयन्बीची कीर्ती कळसाला पोचली. 'टॉयन्बीवरील लेख आमच्या नियतकालिकात छापायची परवानगी द्या', अशी विनंती करणारी चौदा हजारांहून जास्त पत्रे 'टाइम'कडे आली! त्या वर्षी सॉमरव्हेलने तयार केलेल्या (पहिल्या ६ खंडांच्या) सारग्रंथाच्या कापडी बांधणीच्या दोन लाख प्रती खपल्या. केवळ अभ्यासक व तत्त्वचिंतक यांच्यासाठी लिहिलेला निव्वळ विद्वत्तापूर्ण ग्रंथ बाजारपेठेकडे लक्ष ठेवून घडविलेल्या प्रसिद्धिअभियानामुळे वर्षभरात घरोघरी पोचला.

(१)

आर्नोल्ड जे. टॉयन्बी याचा जन्म १८८९ साली झाला. टॉयन्बीचे घराणे हे काही इंग्लंडमधील ऐतिहासिक परंपरा लाभलेल्या रसेल, चर्चिल अशा प्रतिष्ठित घराण्यांपैकी नव्हते. त्याचे आजोबा जोसेफ – ज्यांचे नाव आर्नोल्डच्या नावाला जोडले होते – हे कर्ण-विकारावरील नावाजलेले डॉक्टर होते व त्यांनी खुद्द व्हिक्टोरिया राणीच्या बहिरेपणावर यशस्वी उपचार केले होते. जोसेफ टॉयन्बीचा मुलगा हॅरी याचा आर्नोल्ड टॉयन्बी हा मुलगा. जोसेफ टॉयन्बी यांनी बराच पैसा मिळविला असला, तरी त्यांना पुष्कळ मुले असल्याने हॅरीच्या वाट्याला आलेली रक्कम माफकच होती. हॅरी एका सार्वजनिक सेवा संस्थेत (हल्ली अशा संस्थेला एन्. जी. ओ. म्हणतात.) नोकरी करीत असे. तिथे मिळणारा पगारही फार नव्हता. परिस्थिती गरिबीची नसली तरी सुखवस्तू म्हणावी अशीही नव्हती. हॅरी हा अस्वस्थ मनोवृत्तीचा मनुष्य होता व पुढे १९११ साली त्याला मनोरुग्णालयातच ठेवावे लागले.

आर्नोल्डची आई एडिथ ही मुलाबद्दल महत्त्वाकांक्षा बाळगणारी स्त्री होती. तिच्या काळी इंग्लंडमधील विद्यापीठांत स्त्रियांना मज्जाव होता. या नियमातून केंब्रिज विद्यापीठाने अशी पळवाट काढली होती की, स्त्रियांनी बाहेरून विद्यापीठाच्या परीक्षेला बसावे; उत्तीर्ण झाल्यास त्यांना उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र मिळेल, पण पदवी देण्यात येणार नाही. एडिथने इतिहास हा विषय घेऊन पदवी-परीक्षा दिली व ती परीक्षेत पहिली आली! पुढे ती शाळेत शिक्षिका झाली. मात्र लग्नानंतर तिने नोकरी सोडली व संसार पतकरला.

आईकडून प्रेरणा मिळाल्याने आर्नोल्डने विंचेस्टर नावाच्या जुन्या व प्रसिद्ध शाळेत शिष्यवृत्तीसह प्रवेश मिळवण्यासाठी परीक्षा दिली. तिथे त्याला प्रवेशही मिळाला. १९०२ सालापासून १९०७ सालापर्यंत टॉयन्बी या शाळेत होता. त्या काळी 'पब्लिक स्कूल'मध्ये ग्रीक व लॅटिन या प्राचीन भाषांचा सपाटून अभ्यास करून घेतला जाई. या भाषांत टॉयन्बी इतका पारंगत झाला की, भाषणे, निबंध, कविता यांची रचना तो या भाषांतून करू लागला. खेरीज ग्रीक व रोम यांच्या इतिहासाचा त्याने बारकाईने अभ्यास केला होता. अशा असाधारण विद्यार्थ्यांबद्दल शिक्षकांनी बळकट अपेक्षा बाळगल्या होत्या.

असा हा गुणी विद्यार्थी १९०७ साली ऑक्सफर्ड विद्यापीठातील 'बेलियल' या महाविद्यालयात दाखल झाला. तेथे तो १९११ सालापर्यंत होता. त्या काळी हे महाविद्यालय सर्वोत्तम म्हणून गणले जात होते. पुढे पंतप्रधान झालेला आस्क्विथ, परराष्ट्रमंत्री असलेला एडवर्ड ग्रे, हिंदुस्थनाचा व्हॉईसरॉय लॉर्ड कर्झन हे सर्व बेलियलचे विद्यार्थी होते. बेलियलच्या विद्यार्थ्याला उत्तम दर्जाची सरकारी किंवा खाजगी नोकरी मिळणार, हे ठरलेले होते.

तथापि, टॉयन्बीला बौद्धिक क्षेत्रातच काम करावयाचे होते. उच्च दर्जाचा आणि गाढा इतिहासकार होण्याची त्याची महत्त्वाकांक्षा होती. प्राचीन भाषा व संस्कृती








यांचा सखोल अभ्यास करण्याची परंपरा जर्मनीत विकास पावली होती. एदुआर्द मेयर या इतिहासकाराने ईजिप्त, बॅबिलोन, ग्रीस व रोम यांच्या प्राचीन इतिहासाचे प्रदीर्घ मंथन करून १८८४ ते १९०२ या दीड तपाच्या काळात त्या संस्कृतींच्या परस्परसंबंधांची व उन्नति-अवनतीची हकिकत पाच खंडांत लिहिली होती. या ग्रंथाचा मोठा प्रभाव टॉयन्बीवर पडला होता. टॉयन्बीने महाविद्यालयीन अभ्यासक्रम उत्कृष्ट रीतीने पूर्ण केलाच; पण वक्तृत्व, टेनिस, (विद्यापीठात ज्याला मोठी प्रतिष्ठा होती ती) होडी वल्हविण्याची कला, घोड्यावर बसणे वगैरे कौशल्येही हस्तगत केली. शेवटच्या वर्षी अतिसन्मानाचे समजले गेलेले जेंकिन्स पारितोषक त्याला मिळाले. इटली व ग्रीस या देशांचा एक वर्षभर प्रवास करता यावा, यासाठी मोठी रक्कम या पारितोषिकाच्या रूपाने टॉयन्बीला देण्यात आली. हा प्रवास पूर्ण केल्यावर बेलियल महाविद्यालयातच प्राचीन इतिहासाचा शिक्षक म्हणून यावे, असे आमंत्रणही महाविद्यालयाने त्याला दिले !

ग्रीस व इटाली या देशांत प्रवास करून ग्रीक व रोमन संस्कृती जिथे नांदल्या त्या भागाची पाहणी करण्याची संधी जेंकिन्स पारितोषिकामुळे टॉयन्बीला मिळाली. सबंध वर्ष (१९११-१२) त्याने या प्रदेशात पायी किंवा सायकलवरून हिंडण्यात घालवले. त्याच्यावर अनेक संकटे गुदरली. दरोडेखोरांनी त्याला रस्त्यात अडवून त्याचे पैसे काढून घेतले. त्या वेळी ग्रीस व बल्गेरिया यांच्यात युद्ध होण्याची चिन्हे होती. ग्रीक पोलिस दक्ष होते. टॉयन्बी हा हेर आहे, या संशयावरून त्याला अटक करण्यात आली. तहानलेल्या स्थितीत एका नदीचे दूषित पाणी त्याला प्यावे लागून तो गंभीर आजारी झाला व पुढे हा आजार सांभाळतच अनेक वर्षे त्याला काढावी लागली.

तथापि, ग्रीस व इटाली या देशांत मनमुराद भटकल्यामुळे ग्रीस व इटाली यांच्या नागरिकांच्या जीवनशैलीशी त्याचा दाट परिचय झाला. या दोन्ही समाजांची प्राचीन संस्कृती व वर्तमान वास्तव यांची तुलना करता आली. ग्रीक व लॅटिन ग्रंथांतून अनेक युद्धांच्या कथा त्याने रंगून जाऊन वाचल्या होत्या – ती रणांगणे निरखताना आपण प्रत्यक्ष लढाईच पाहत आहोत, असा भास त्याला झाला. त्याने हा अनुभव वर्णन करताना लिहिले आहे, 'ती जागा पाहताना काळाच्या प्रवाहाखाली एकवीस शतके इतक्या खोलीवर मी बुडी मारली.' इतिहासकाराजवळ प्रतिभा असेल तर आजच्या वास्तवाच्या आणि ऐतिहासिक साधनांच्या अभ्यासातून तो गतकाळ जिवंत करू शकतो, असा विश्वास त्याला वाटला.

(२)

प्रवासाचे वर्ष संपवून इंग्लंडला परतल्यावर दूषित पाणी पिऊन झालेल्या आजारामुळे टॉयन्बीला ६ आठवडे रुग्णालयात काढावे लागले. ऑक्टोबर १९१२ मध्ये तो बेलियल महाविद्यालयात प्राचीन (म्हणजे ग्रीको-रोमन लोकांचा) इतिहास शिकवू लागला. टॉयन्बीचा प्रयास असा असे की, विद्यार्थ्यांनी या प्राचीन मनुष्यांच्या मानसिकतेत प्रवेश करावा; त्यांच्या दृष्टीने ते ऐतिहासिक प्रसंग विद्यार्थ्यांनी अनुभवावे. पण इतक्या तपशिलानिशी घटनेचे आकलन करून घेण्याचा आवाका क्वचितच कोण्या विद्यार्थ्याचा असे. त्यामुळे शिक्षक म्हणून टॉयन्बी नाव मिळवू शकला नाही. पण शिक्षकाचे दुसरे कार्य जे संशोधन, त्यात मात्र त्याने आपल्या संशोधन-जीवनाच्या सुरुवातीलाच लक्षणीय कामगिरी केली.

१९१४ च्या ऑगस्टमध्ये पहिले महायुद्ध सुरू झाले. टॉयन्बीच्या आजारामुळे त्याला सैन्यात भरती होण्यास अपात्र ठरविण्यात आले. टॉयन्बीच्या बरोबरीचे बहुतेक तरुण सैन्यात दाखल झाले व त्यांतले निम्मे युद्धात मारले गेले. आपण सैन्यात गेलो नाही हा सल टॉयन्बीला आयुष्यभर बोचत राहिला. मात्र टॉयन्बीचा उपयोग ब्रिटनच्या परराष्ट्रखात्याने करून घेतला. 'पोलिटिकल इंटेलिजन्स डिपार्टमेंट' या विभागात युरोप व रशिया यांच्या सरहद्दीवरील राष्ट्रांतील राजकीय घडामोडींचा तज्ज्ञ म्हणून त्याने काम केले.

पहिले महायुद्ध १९१८ च्या नोव्हेंबर महिन्यात संपले. १९१९ साली पॅरिसला शांततापरिषद भरली व विजेत्या राष्ट्रांनी जित राष्ट्रांवर कोणत्या अटी घालून तह करावा, याच्या वाटाघाटी सुरू झाल्या. त्या वेळी इंग्रज शिष्टमंडळाला मदत करण्यासाठी टॉयन्बी व त्याचे सहकारी गेले होते. टॉयन्बीकडे कामगिरी अशी होती





की, पराभूत तुर्की साम्राज्याच्या बाबतीत इंग्रजांचे धोरण काय असावे, याचा मसुदा तयार करावा. टॉयन्बीने या बाबतीत असे सूत्र ठरविले होते की, इथून पुढच्या ४०--५० वर्षांत युरोप व आशिया यांच्या सरहद्दीवर असणाऱ्या भागात – म्हणजे मुख्यतः तुर्की साम्राज्यात असलेल्या मुस्लिम प्रदेशात – कमकुवत झालेले ब्रिटिश साम्राज्य आणि ज्यांना आत्मभान सापडलेले आहे असे अरब, ज्यू व अरबेतर मुस्लिम समाज यांच्यामध्ये झगडा चालत राहील. या झगड्याचे परिणाम हिंदुस्थान, इराण, अफगाणिस्तान या देशांवरही होतील. तेव्हा ब्रिटिशांनी तुर्कस्थानाशी मवाळ धोरण स्वीकारून त्या देशाला चुचकारून घ्यावे. पण झाले असे की, इंग्लंडचा पंतप्रधान लॉइड जॉर्ज याने वाटाघाटींची सर्व सूत्रे आपल्या हाती ठेवली आणि 'पोलिटिकल इंटेलिजन्स डिपार्टमेंट' मधील तरुण विशेषज्ञांच्या मसुद्यांचा काहीच उपयोग करून घेतला नाही. तुर्की साम्राज्यातील मोठमोठे प्रदेश इंग्लंड व फ्रान्स यांनी आपल्या अखत्यारीत घेतले. अरब देश तुर्कस्थानापासून वेगळे केले. या बनावामुळे टॉयन्बीचे मन विटून गेले.

'पोलिटिकल इंटेलिजन्स डिपार्टमेंट'मध्ये टॉयन्बीची नेमणूक युद्धकाळापुरतीच होती. पुढे असा विचार आला की, हा विभाग कायमस्वरूपी ठेवावा. टॉयन्बीचे काही सहकारी त्या विभागात काम करीत राहिलेदेखील. पण टॉयन्बीने नोकरी सोडली. नंतर तो वृत्तपत्रातून लेख लिहून लॉइड जॉर्ज सरकारच्या परराष्ट्रधोरणावर टीका करू लागला. या कामातून त्याला पैसे मिळालेच, पण नावलौकिकही झाला.

इंग्लंडमध्ये राहणारे ग्रीक लोक व ग्रीसचे सरकार या दोघांनी देणग्या देऊन लंडन विद्यापीठाच्या किंग्ज कॉलेजमध्ये 'पूर्व रोमन साम्राज्य व ग्रीस यांचा इतिहास' या विषयासाठी एक अध्यासन १९१९ साली निर्माण केले. त्यावर प्राध्यापक म्हणून टॉयन्बीची नेमणूक पाच वर्षांसाठी झाली. १९२० साली इंग्लंडच्या चिथावणीवरून ग्रीसने तुर्कस्थानावर आक्रमण केले. तेव्हा युद्ध-वार्ताहर म्हणून टॉयन्बी ग्रीसमध्ये गेला व त्याने वृत्तपत्रातून ग्रीसचा निषेध करणारे लेख लिहिले. साहजिकच ज्यांच्या देणगीतून अध्यासन निर्माण झाले होते, ते देणगीदार नाराज झाले. अध्यासनाचे विश्वस्त, लंडन विद्यापीठ आणि टॉयन्बी यांच्यातील बेबनावाची चर्चा वृत्तपत्रांतून झाली. १९२४साली टॉयन्बीने प्राध्यापकपदाचा राजीनामा दिला. (नाहीतरी नेमणुकीची मुदतही संपतच होती.)

त्यानंतर इंग्लंडमध्ये आंतरराष्ट्रीय संबंधांचा अभ्यास करणारी एक संस्था स्थापन झाली. तिला पुढे 'रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ इन्टरनॅशनल अफेअर्स' असे नाव मिळाले. या संस्थेचे मुख्य काम असे होते की, तिने दर वर्षी आंतरराष्ट्रीय संबंधांविषयी एक विस्तृत आणि तटस्थ व अभ्यासपूर्ण अहवाल प्रसिद्ध करायचा. या अहवालाचा संपादक म्हणून संस्थेने टॉयन्बीची नेमणूक केली आणि वर्षाला १२०० पौंड असा घसघशीत पगार त्याला देऊ केला. खेरीज सर्व कार्यालयीन साहाय्य त्याला मिळणार होतेच. हे काम त्याने अतिशय वक्तशीरपणे व नेटकेपणाने ३२ वर्षे पार पाडले. आर्थिक स्वस्थता लाभल्यामुळे संस्थेच्या ठरीव कामासाठी द्यावा लागणारा वेळ व वैचारिक शक्ती वगळता आपला बाकीचा वेळ व चिंतन तो आपल्या महा-इतिहासासाठी खर्च करू शकला.

(३)

आपल्या महाग्रंथाचे मध्यवर्ती सूत्र काय असावे, याविषयी टॉयन्बीने सात-आठ वर्षे कसून विचार केला होता. पहिल्या महायुद्धाच्या आधीपासून त्याने ग्रीस व तुर्कस्थान यांच्यातील झगड्याचा विचार चालवला होता. त्या विषयावर त्याने एक पुस्तकही लिहिले होते. युरोपीय दृष्टिकोणातून पाहता नजीक पूर्वेची संस्कृती आणि मध्यपूर्वेची संस्कृती या दोन संस्कृतींतील संघर्ष अशा स्वरूपात त्याने ग्रीस-तुर्कस्थान यांच्यातील वैराकडे पाहिले होते. टॉयन्बीने या प्रश्नाचे विश्लेषण असे केले होते की, वरील दोन्ही संस्कृती पश्चिम युरोपातील संस्कृतीच्या सहवासात आल्या आहेत व त्या संस्कृतीपुढे हतप्रभ झाल्या आहेत. त्यांना पाश्चात्त्य संस्कृतीविषयी आकर्षण आहे, पण पाश्चात्त्य संस्कृती आत्मसात करण्यात त्या अयशस्वी झाल्या आहेत. या संस्कृतींना पाश्चात्त्य संस्कृतीचे आकर्षण वाटले, हीच त्या संस्कृतींच्या ऱ्हासाची खूण आहे.

१९१९-२० साली टॉयन्बीने लंडन विद्यापीठात प्राचीन इतिहासावर ६ व्याख्याने दिली. तेथेही त्याने हा इतिहास








म्हणजे ग्रीस, मेसोपोटेमिया व ईजिप्त या तीन संस्कृतींमधील संबंधांचा इतिहास होय, असे स्पष्ट केले होते. तसेच, संस्कृती म्हणजे काय व ती कशी उदय पावते, याचे त्याने वर्णन केले होते. मनुष्याचा विकास होणे याचा अर्थ मुनष्याने निसर्ग-नियमांचा उपयोग करून आपल्या भवतालावर अधिकाधिक प्रमुख मिळवणे होय. असा विकास होता होता अचानक एक वेळ अशी येते की, मनुष्य व त्याचा भवताल यांच्यातील नातेसंबंध निसर्ग-नियमांच्या अनुरोधाने न ठरता मनुष्याच्या इच्छाशक्तीच्या बळावर ठरवले जातात आणि तेव्हा संस्कृतीचा उदय होतो. मनुष्य आपल्या भवतालावर आपल्या अस्तित्वाच्या ज्या मुद्रा वेळोवेळी उठवतो, त्यांचा अभ्यास करून पुढच्या पिढ्या आपल्या पूर्वजांच्या हालचालींचा इतिहास रचतात. मनुष्याच्या निसर्गाविरुद्धच्या संघर्षातून संस्कृती उभी राहते व म्हणूनच संस्कृती ही मनुष्याच्या स्वातंत्र्याचा आविष्कार असते.

सारांश, इतिहासाच्या बांधणीतील मूलभूत घटक राष्ट्र, कालखंड किंवा विशिष्ट संस्था हे नसून संस्कृती होय, ह्या निष्कर्षाप्रत टॉयन्बी १९२० च्या सुमारासच पोचला होता. आपल्या महाग्रंथात कोणकोणत्या विषयांचे विवरण करावयाचे, याचे टाचण १९२१ साली टॉयन्बीने तयार केले होते. (त्यांपैकी फारच थोडे विषय ग्रंथात उतरले.) त्यांतला महत्त्वाचा विषय म्हणजे 'निरनिराळ्या संस्कृतींची तुलना', हा होय. एका संस्कृतीच्या उदयापासून ऱ्हासापर्यंत ज्या अवस्था पाहायला मिळतात त्यांची यादी टॉयन्बीने केली. संस्कृतींची तुलना करायची म्हणजे एकेका अवस्थेतील त्यांच्या रूपांचे वर्णन करावयाचे व त्यांतील साम्य तपासावयाचे.

थोडक्यात, समग्र मानवजातीचा यथासांग इतिहास लिहावयाचा तर पृथ्वीच्या पाठीवर ज्या संस्कृती नांदल्या, विलयाला गेल्या किंवा अजून अस्तित्वात आहेत, त्यांच्या इतिहासातील साम्य व तफावत पाहून इतिहासाचे काहीएक सूत्र शोधून काढले पाहिजे. टॉयन्बीने अठ्ठावीस संस्कृती नोंदविल्या आहेत. त्यांपैकी अठरा संस्कृती आता अस्तित्वात नाहीत. आज ज्या नांदत्या दहा संस्कृती आहेत, त्यांपैकी दक्षिण पॅसिफिकमधील बेटांवरील (पॉलिनेशियन) संस्कृती, एस्किमो लोकांची संस्कृती आणि जिप्सी वगैरे भटक्या जमातींची संस्कृती या खुरटलेल्या संस्कृती आहेत. ज्या सात संस्कृती उरल्या त्या अशा : पाश्चात्त्य संस्कृती, पूर्व युरोपातील 'ऑर्थोडॉक्स चर्च'च्या आधाराने उभी असलेली संस्कृती, तिचीच शाखा असलेली रशियन संस्कृती, मुस्लिम संस्कृती, हिंदू संस्कृती, दूर पूर्वेतील चिनी संस्कृती व तिचीच शाखा असलेली जपानी संस्कृती. या सात संस्कृतींमध्येही पाश्चात्त्य संस्कृती वगळता बाकीच्या सहा संस्कृती खिळखिळ्या झाल्या असून पाश्चात्त्य संस्कृती हीच काय ती अद्याप जोमात आहे, असा महत्त्वाचा निष्कर्ष टॉयन्बीने पहिल्या सहा खंडांच्या अखेरीस काढला होता व यामुळेच अमेरिकेत टॉयन्बीच्या महाग्रंथाची मोठी प्रसिद्धी व चहा झाली. असो.

एक संस्कृती संपली म्हणजे मरूनच गेली, असे नाही; तिच्यापासून निराळ्या संस्कृती निर्माण होऊन, म्हटले तर तीच संस्कृती अपत्यसंस्कृतींच्या रूपाने जिवंत राहिलेली असते. उदा., ग्रीक समुद्रातील बेटांवर राहणाऱ्या जमातींनी स्वतःची 'मिनोअन' नावाची संस्कृती इ. स. पू. ३००० च्या सुमारास निर्माण केली. इ. स. पू. १७५० च्या सुमाराला तिचे विभाजन होऊन 'हेलेनिक' (म्हणजे ग्रीसमधील) व 'सीरियाक' (म्हणजे सीरियातील) अशा दोन संस्कृती निर्माण झाल्या. नंतर इ. स. पू. ३१ या वर्षी 'हेलेनिक' संस्कृतीचे विघटन झाले. त्या विघटनातून 'पाश्चात्त्य संस्कृती' व 'ऑर्थोडॉक्स ख्रिश्चन' संस्कृती अशा दोन संस्कृती उदय पावल्या. आपली हिंदू संस्कृती इ. स. पू. ५०० च्या सुमारास 'इंडिक संस्कृती' (म्हणजे सिंधू संस्कृती) पासून जन्माला आली. काही संस्कृती (उदा., एस्किमोंची संस्कृती) अशाही आहेत की, प्राथमिक अवस्थेतील समाजाने भवतालावर काही प्रमाणात कब्जा केला व संस्कृतीची पदचिन्हे उमटविली. पण नंतर हा समाज आणखी पुढे न जाता पुन्हा प्राथमिक अवस्थेकडेच झुकला.

(४)

संस्कृतीचा जन्म कसा होतो याचे विवेचन टॉयन्बीने ईजिप्शियन संस्कृतीच्या उदयाचे उदाहरण घेऊन केले आहे. सध्याचे सहारा वाळवंट जेथे आहे तेथे प्राचीन काळी चांगला पाऊस पडत असे व हिरवळीचा प्रदेश

होता. तेथे अनेक फिरत्या जमाती मेंढ्या पाळून राहत असत. नंतर पाऊस कमी होत गेला. हिरवळ आकसत गेली व वाळवंट वाढू लागले. तेव्हा काही जमातींनी निर्णय घेतला की, "आम्ही इथेच राहू व हिरवळीची जी बेटे वाळवंटात राहतील त्यांच्यावर गुजारा करू." काही जमाती पश्चिमेकडील जंगली प्रदेशाकडे सरकत गेल्या. त्यांनी आपला भटकेपणा सोडला नाही. त्या प्राथमिक अवस्थेत जंगलात राहू लागल्या. उरलेल्या जमाती पूर्वेकडे नाईल खोऱ्यातील दलदलीच्या भागात येऊन राहिल्या. त्यांनी चर खणून दलदल कोरडी केली; शेतीला सुरुवात केली व त्या खटपटीतून नाईल (किंवा ईजिप्शियन) संस्कृतीची सुरुवात झाली. सध्या जो अरबांच्या वस्तीचा पश्चिम आशियातील प्रदेश आहे, तेथेही सहा हजार वर्षांपूर्वी असाच हिरवळीचा प्रदेश होता. तोही आकसत गेला. त्या भागातील जमाती टायग्रिस व युफ्राइटिस या नद्यांच्या आश्रयाला गेल्या व तेथे सुमेरियन संस्कृती उभी राहिली. अर्थात, हा फेरफार होण्यासाठी शेकडो वर्षे जावी लागली.

इत्यर्थ असा की, प्राथमिक अवस्थेतील जमातींसमोर जेव्हा एखादी नैसर्गिक आपत्ती उभी ठाकते, तेव्हा त्या आपत्तीशी सामना करताना त्यांना आपले निवासस्थान व जीवनशैली या दोन्ही (किंवा एक) सोडून देऊन निराळ्या निवाऱ्याचा आणि जीवनशैलीचा स्वीकार करावा लागतो. हे करताना त्या जमाती नवीन तंत्राचा व युक्त्यांचा अवलंब करून आपल्या परिसरावर काबू मिळवतात. संस्कृती अशा परिवर्तनातून निर्माण होते.

प्राथमिक अवस्थेतील जमातीने एखाद्या संस्कृतीची पायाभरणी केल्यानंतर तेथील समाजाला केवळ भौगोलिक परिसराचाच अनुभव येतो असे नाही, तर समाजांतर्गत मनुष्यांचा एक परिसरही भौगोलिक परिसराशी जोडून उभा राहतो. अशा स्थितीत समाजाला केवळ नैसर्गिक संकटांनाच तोंड द्यावे लागते असे नाही; मनुष्यांच्या संबंधातून निर्माण होणाऱ्या प्रश्नांवरही मात करावी लागते. उदा., समाजातील सत्ताधारी गट जेव्हा दुसऱ्या एखाद्या गटाला लक्ष्य करून त्याचा छळ करू लागतो, तेव्हा तो बळी ठरलेला गट मूळ संस्कृतीपासून दुरावतो, दुसरीकडे कोठे जातो व नवी नांदणूक सुरू करतो. त्यातून नवी संस्कृती तयार होते. उदा., रोमन साम्राज्याच्या चढत्या काळात तेथील सत्ताधाऱ्यांनी भूमध्य समुद्राच्या काठाच्या, पण पूर्वेकडील, अनेक लोकांना गुलाम करून इटालीत आनले. या गुलामांनी आपल्या कर्तबगारीच्या जोरावर अधिकार मिळविले. ख्रिस्ती धर्माला मोठा पाठिंबा या लोकांकडून मिळाला. नंतर या रयतेपैकी काही लोक इटालीतून ईशान्येकडे गेले. या त्यांच्या स्थलांतरानंतर ऑर्थोडॉक्स ख्रिश्चन संस्कृती विकास पावली. सारांश, एखाद्या समाजासमोर जेव्हा नैसर्गिक किंवा मानवी संबंधाच्या स्वरूपातले आव्हान उभे राहते, तेव्हा त्या आव्हानाला यशस्वीपणे तोंड देताना नवी किंवा परिवर्तनातून निर्माण झालेली संस्कृती मूळ धरताना आढळते.

संस्कृती उदयाला आल्यावर ती वाढत जाते किंवा तिचा विकासच होत जातो असे नाही. आपण पाहिले की, काही संस्कृती खुरटून जातात. ज्या संस्कृती विकास साधतात, त्यांचा विकास कोणत्या प्रक्रियेतून होतो आणि विकासाचा निकष कोणता? संस्कृतीचा उदय हा आव्हानाला तोंड देण्यातून होतो, हे आपण पाहिले. संस्कृतीचा विकासही आव्हानांवर मात करीतच होणार, हे उघड आहे. ती प्रक्रिया पाहण्यापूर्वी विकासाचा निकष कोणता, याचा विचार करू.

आपण पाहिले की, परिसरावर काबू मिळविण्याच्या प्रयत्नातून संस्कृती निर्माण झाली. मनुष्याला अगदी प्राथमिक अवस्थेपासून निसर्गनियमांचा गुलाम बनून राहावे लागले होते. निसर्गाच्या चक्राचा अभ्यास करून व त्या अभ्यासातून निसर्गाला आपल्या फायद्यासाठी वापरण्याचे कौशल्य येईपर्यंतच्या खटपटीतून संस्कृती निर्माण झाली. त्यामुळे असे वाटण्याचा संभव आहे की, संस्कृतिबाह्य अशा परिसरावर एखादी संस्कृती अंमल गाजवू लागली, म्हणजे तिचा विकास झाला, असे मानावे. तथापि, टॉयन्बी असे मानतो की, अशा प्रकारचा विस्तार म्हणजे विकास हे मानणे बरोबर नाही. कारण भौगोलिक विस्तारासाठी व त्याचे रक्षण करण्यासाठी समाजाला लष्कराची बांधणी करावी लागते व लष्करीकरण हे अंततः समाजाला दुर्बल करते.

टॉयन्बीच्या मते विकासाचे खरे गमक हे की, नव्या






परिस्थितीशी सामना करण्यासाठी समाज स्वतःच्या ठेवणीत बदल घडवून आणण्यास तयार असला पाहिजे. हा लवचीकपणा समाजात मुरला असेल तर समाज (आणि त्या समाजाने बांधलेली संस्कृती) विकास पावतो आहे, असे म्हणता येईल. या लवचीकतेचे उदाहरण पाश्चात्त्य संस्कृतीच्या इतिहासातून टॉयन्बीने दिले आहे. मध्ययुगाच्या सुरुवातीला पश्चिम युरोपातील समाजाला स्फॉण्डिनेव्हिया भागातून होणाऱ्या रानटी जमातींच्या हल्ल्यांना सामोरे जावे लागे. या समस्येवर तोड म्हणून पश्चिम युरोपीय समाजाने स्वतःला सरंजामदारीचे वळण घालून घेतले. ठिकठिकाणी किल्ले व गढ्या उभारून प्रबळ सरंजामदार आपल्या अंकित प्रजेचे रक्षण करू लागले. या योजनेमुळे रानटी व्हायकिंग टोळ्यांच्या हल्ल्यांचे निवारण झाले. पण नंतर सरंजामदार आपसांत लढू लागले. सर्वत्र अस्वस्थता व अराजक माजले. तेव्हा अनेक वर्षांच्या खटपटीनंतर या समाजात सार्वभौम राजे आणि त्यांचे नागरिक अशी व्यवस्था निर्माण झाली. हा लवचीकपणा पश्चिमी संस्कृतीने पुढेही वारंवार दाखविला. प्रत्येक टप्प्यावर त्या संस्कृतीचा विकासच होत गेला. इथे हेही लक्षात घेतले पाहिजे की, प्रगतीचा एक टप्पा पार पडला की, त्यातूनच पुढचा प्रश्न निर्माण होतो.

आता प्रश्न येतो की, हा बदल कसा घडून येतो? ह्या बदलाचे कर्ते कोण असतात? या नवीन बदलाचे स्वागत समाजातील सर्व घटकांकडून का व कसे होते? प्रत्येक समाजात उपक्रमशील व्यक्ती किंवा व्यक्तिसमूह हर घटकेला असतातच. नवीन प्रश्न उभे राहिले की, समाज भांबावून जाऊन अगतिक होतो. अशा वेळी समाजातील धुरंधर व्यक्ती किंवा धुरंधर वर्ग आपणास समाजातील अस्वस्थतेपासून दूर ठेवून व परिस्थितीवर चिंतन करून काही नवा विचार निश्चित करतात. बुद्ध किंवा मुहम्मद पैगंबर यांच्या आयुष्यात अशी वर्षे येऊन गेल्याचे आपणास माहीत आहे. असा निश्चित विचार घेऊन धुरंधर वर्ग समाजापुढे येतो व स्वतःच्या उपदेशातून व वर्तनातून समाजाला धडा घालून देतो. अवांतर समाज त्यांचे अनुयायित्व स्वीकारून स्वतःच्या व्यवहाराला नवीन शिस्त घालून देतो. ही प्रक्रियादेखील पन्नास-शंभर वर्षे चालत राहाते. जुनी कात टाकून समाज नवीन कांती धारण करतो.

याचे उत्तम उदाहरण म्हणजे औद्योगिक क्रांतीच्या अनुषंगाने पश्चिमी संस्कृतीच्या राज्यव्यवहारात घडून आलेले परिवर्तन हे होय. पश्चिम युरोपात औद्योगिक क्रांतीमुळे नवश्रीमंतांचा कर्तबगार वर्ग पुढे आला व राज्ययंत्रणेवर आजवर ज्याने वर्चस्व गाजविले होते अशा जमीनदार वर्गाकडे राज्ययंत्रणेतील वाटा मागू लागला. अशा वेळी इंग्लंड हे युरोपातील राजकीय उलाढालींपासून अलिप्त होते. त्यांनी १८ व्या शतकाच्या सुरुवातीला या समस्येवर उपाय शोधून काढला. १६८९ सालच्या रक्तहीन राज्यक्रांतीनंतर त्यानी राजघराण्याची राज्ययंत्रणेवरची पकड नाहीशी केली. संसदेला जादा अधिकार दिले व 'लोकशाही मार्गा'ने नवोदित श्रीमंत वर्गाला राज्यकारभारात प्रवेश सुलभ करून दिला. हा नवा आदर्श पाश्चात्त्य संस्कृतीपुढे ठेवण्यात आला. संपूर्ण १९ वे शतक हे पाश्चात्त्य संस्कृतीतील इतर समाजांनी इंग्लंडचे अनुकरण करण्यात घालविले. इतर संस्कृतींच्या इतिहासातूनही अशी उदाहरणे दाखविता येतील.

विकासाची ही जी प्रक्रिया आपण मांडली, तिच्यामध्येच समाजातील फाटाफुटीची बीजे दिसून येतात. प्रश्नाचे उत्तर शोधणारा धुरंधर वर्ग, त्या वर्गाने काढलेल्या उत्तराचे महत्त्व पटून स्वखुशीने अनुकरण करणारा अनुयायी वर्ग आणि यापेक्षा निराळी राहिलेली पण अनिच्छेने समाजाची नवी घटना जीवर लादली गेली आहे अशी प्रजा अशी तिहेरी विभागणी स्पष्टच आहे. धुरंधर वर्गाने काढलेला तोडगा यशस्वी ठरला, तर समाज एकत्र राहतो. त्या तोडग्याची फळे मिळावयास उशीर झाला किंवा तोडगा यशस्वी झाला नाही, तर फाटाफूट वाढून समाज खिळखिळा होतो व नंतर त्याचे विघटन होते. संस्कृतीच्या या पुढच्या अवस्था आता पाहायच्या आहेत.

(५)

आपण पाहिले की, समाजासमोर समस्या उभी राहिली की, तिचे उत्तर शोधण्याची जबाबदारी धुरंधर वर्गावर पडते. हा धुरंधर वर्ग कसा निर्माण होतो? नजीकच्या इतिहासात निर्माण झालेल्या समस्येवर ज्याने उतारा काढला तोच वर्ग, थोड्याफार बदलाने, नवीन समस्या निर्माण होताना, धुरंधर वर्ग म्हणून समाजावर

अनुक्रमणिका

वर्चस्व गाजवत असतो. नवीन समस्येवर याच वर्गाने तोडगा काढावा, अशी समाजाची अपेक्षा असते. तसे करण्यांत प्रस्थापित धुरंधर वर्ग अपयशी ठरल्यास त्याने दुसऱ्या कोणा सर्जनशील समूहाने सुचविलेल्या उपायाचे अवलंबन करावे व त्या सर्जनशील समूहाला आपल्यात समाविष्ट करून घ्यावे. पण असे होण्याचा संभव आहे की, प्रस्थापित धुरंधर वर्गालाच नव्हे तर समाजाच्या कोणत्याच घटकाला नवीन आव्हानाला सामोरे कसे जावे, हे सुचत नाही; किंवा कोण्या सर्जनशील वर्गाला उपाय सुचतो, पण तो समाजापुढे मांडण्याची परवानगी त्या वर्गाला प्रतिष्ठित धुरंधर समाज देत नाही. अशा वेळी प्रतिष्ठित धुरंधर समाज केवळ एक अधिकार गाजविणारा अल्पसंख्य वर्ग होऊन राहतो. त्या धुरंधर वर्गाचे नेतृत्व अवांतर समाजाने स्वीकारले होते, कारण मागील टप्प्यावरील समस्येवर या वर्गाने तोडगा काढला होता व त्याचा स्वीकार अवांतर समाजाने धुरंधर वर्गाचे अनुकरण व अनुयायित्व पतकरून केला होता. नवीन आव्हानासमोर धुरंधर वर्ग हतबल ठरल्यावर अवांतर समाज धुरंधर वर्गाला दिलेली मान्यता काढून घेतो व केवळ सत्ताधारी आहे या कारणास्तव धुरंधर वर्गाचा अंकित बनतो; किंवा त्याच्या विरुद्ध बंडेही करतो. सारांश, समाजातील एकजिनसीपणा किंवा एकात्मता संपुष्टात येते.

हे सर्व कसे घडून येते? विकासाची जी प्रक्रिया आपण सांगितली, त्यातच या अवनतीची बीजे दडलेली आहेत. आव्हान (अ) याच्याशी सामना करताना एक धुरंधर वर्ग पुढे आला व प्रतिष्ठित होऊन राहिला. हा सामना करताना धुरंधर वर्गाने समाजाची नवी घडी बसवली, नव्या संस्था निर्माण केल्या. या संस्थांद्वारे धुरंधर वर्गाने अवांतर समाजाशी दळणवळण ठेवले व अवांतर समाजाचे मन आपल्या विचारांचा स्वीकार करण्याकडे वळवले. हे होत असताना धुरंधर वर्ग प्रतिष्ठित झाला व त्याच्या लक्षात आले की, अवांतर समाज, खरेतर, आपली मते विचारपूर्वक स्वीकारतो असे नाही; बहुतेक वेळा तो फक्त आपल्या वागणुकीची नक्कल करतो. त्यामुळे अवांतर समाजाची मनधरणी करून आपले नेतृत्व टिकविण्यापेक्षा बळजबरीने आपले नेतृत्व लादणे हे सोईस्कर होय. आता आव्हान (आ) समाजासमोर आले. प्रस्थापित वर्गाला एकतर त्यावर तोडगा सापडत नाही; सापडला तरी दळणवळण संस्था निकामी झाल्यामुळे अवांतर समाजाची मनधरणी प्रस्थापित वर्ग करू शकत नाही; सत्ताधारी व अवांतर समाज यांत जबरदस्ती हे एकच संवादाचे साधन उरल्याने अवांतर समाजाने आव्हान (आ)वर उपाय शोधला तरी तो सत्ताधाऱ्यांपर्यंत पोचत नाही. सारांश, आव्हान (आ) समोर प्रस्थापित वर्ग व अवांतर समाज हतबल होऊन जातात. समाजाने नव्या परिस्थितीशी जुळवून घेण्यासाठी जो लवचीकपणा दाखवायला हवा, तो उरलेलाच नसतो.

पुष्कळदा असे होते की, आव्हान (अ) वर विजय मिळविताना समाजाने स्वतःची जी नवी घडी बसविलेली असते, त्या नव्या घटनेपासून समाजाला प्राप्त होणाऱ्या सौख्याची भुरळ समाजाला पडते व आव्हान (आ)शी सामना करण्यासाठी या प्रस्थापित घटनेला धक्का बसेल असा बदल घडवून आणण्यास समाज नाराज असतो. आव्हान (आ)वर काय उपाय योजावा हे सुचूच नये इतका समाज प्रज्ञाशून्य झालेला असतो, असे नाही; पण तो उपाय स्वीकारण्याची त्याची – किंवा धुरंधर वर्गाची – तयारी नसते. इतिहासात याची अनेक उदाहरणे आढळतात. आपल्याला माहीत आहे की, इ. स. पू.७०० च्या पूर्वी ग्रीसमध्ये नगर-गण-राज्ये स्थापन झाली. प्रत्येक नगर-गण-राज्य हे आर्थिक व राजकीय दृष्ट्या स्वयंपूर्ण व सार्वभौम होते. इ. स. पू. ७०० ते ६०० या शतकात काही शहर-गण-राज्यांनी केवळ अन्नधान्याचे उत्पादन घेण्याचे सोडून पैसे देणारी पिके घ्यावयास सुरुवात केली. त्यामुळे समृद्धी व वेगवेगळ्या नागरी-गण-राज्यांतील दळणवळण व व्यापार वाढला. ही गणराज्ये परस्परांवर अवलंबून राहू लागली. साहजिकच प्रश्न आला की, नागरी-गण-राज्यांनी एकत्र येऊन एक संघराज्य बनवावे काय? पण नागरी-गण-राज्य या संकल्पनेची भुरळ ग्रीक संस्कृतीला इतकी पडली होती की, अशा संघराज्याच्या घडणीस नगर-राज्ये तयार होईनात इ. स. पू. ५व्या शतकापासून या भांडणामुळे ग्रीक संस्कृती खिळखिळी झाली.

यानंतर संस्कृतीच्या आयुष्यक्रमातील शेवटचा म्हणजे

संस्कृतीच्या विघटनाचा कालखंड सुरू होतो. आपण पाहिले की, संस्कृती खिळखिळी होताना तिच्यात, आपले प्रभुत्व लादणारा धुरंधर वर्ग आणि ज्याने धुरंधर वर्गाचे प्रभुत्व सहन केले आहे पण धुरंधर वर्गाशी असलेले अनुयायित्व सोडले आहे असा अवांतर समाज, असे दोन विभाग पडतात. याखेरीज या संस्कृतीच्या प्रभावाखाली असणारा पण संस्कृतीचा भाग नसलेला असा संस्कृतीच्या भौगोलिक सीमांच्या पलीकडे असणारा मनुष्यसमूहही असतो. संस्कृती खिळखिळी झाली, तिच्यातील सृजन संपुष्टात आले की, हा मनुष्यसमूह पुनः आपल्या प्राथमिक अवस्थेकडे झुकतो.

संस्कृतीचा विकास थांबला, की हे तीनही गट सैरभैर होतात. या गटांतील व्यक्तींच्या वागणुकीतही टोकाचे बदल झालेले दिसतात. अभिजात, प्रगल्भ व नवनिर्मितिप्रवण अशी मानसिकता हरवल्यामुळे व्यक्ती आपल्या विचित्र वागणुकीतून आपण नवे घडवू पाहत आहोत, अशी स्वतःशी प्रतारणा करतात. धुरंधर वर्गातील लोक अवांतर समाजातील ग्राम्य वर्तन उचलतात किंवा संस्कृतिबाह्य प्राथमिक समाजातील बेदरकारीचे कौतुक करू लागतात. जीवनाचे रितेपण, दैववाद, प्राक्तन इत्यादी संकल्पनांचा पगडा समाजावर बसतो. संस्कृतीची बंधने शिथिल झाली की, समाज कसा बहकतो याचे बरेच विवेचन टॉयन्बीने केले आहे.

अशा ह्या विमुक्त अवस्थेतील समाजातील दोन घटक वेगवेगळ्या मार्गांनी समाजाची घडी बसविण्याचा प्रयत्न करतात. धुरंधर समाज एक सर्वंकष राज्ययंत्रणा उभारण्याच्या मागे लागतो. ही राज्ययंत्रणा हा वर्ग स्वतः उभारतो किंवा बाहेरून आयात करतो. रोमन साम्राज्य हे अशा राज्ययंत्रणेचे चांगले उदाहरण आहे. या राज्ययंत्रणेला आधार देईल अशी विचारप्रणालीही हा वर्ग तयार करतो. हिंदुस्थानात स्थापलेले ब्रिटिश राज्य ही बाहेरून आयात केलेली सर्वंकष राज्ययंत्रणा होती. त्या राज्ययंत्रणेची सयुक्तिकता पटविणारी विचारप्रणालीही येथील अंकित विचारवंतांनी तयार केली होती. धुरंधर वर्गापासून विलग झालेला अवांतर समाज आपली स्थानिक श्रद्धास्थाने व उपासनापद्धती सोडून अधिक वरच्या पायरीवरील धर्मचिंतनात निःश्रेयस शोधू पाहतो. हे धर्मचिंतन संस्कृतीच्या बाहेरूनही आलेले असू शकते. उदा., रोमन साम्राज्यातील अवांतर समाजाने प्रथम ख्रिश्चन धर्माचा स्वीकार केला व नंतर राज्यकर्त्यांनीही तो धर्म उचलून धरला.

सर्वंकष राज्ययंत्रणा व उच्च धर्माचा स्वीकार या गोष्टींमुळे संस्कृतीचे विघटन होण्याचे लांबणीवर पडते खरे; पण ह्या दोन्ही घटना खरेतर संस्कृतीच्या विघटनेच्या प्रवासाच्याच द्योतक असतात. सर्वंकष राज्ययंत्रणा टिकविण्यात समाजाची फार मोठी शक्ती आणि संपत्ती खर्च होत राहते. समाजबाह्य असंस्कृत टोळ्यांना उच्च धर्म व बलिष्ठ राज्ययंत्रणा ही दोन्ही आपल्या मान्याची लक्ष्ये म्हणून वापरता येतात. मुख्य म्हणजे या दोन्ही गोष्टी सर्जनशीलतेला अडथळा ठरतात व समाजाची लवचीकता घालवतात. बरे, राज्ययंत्रणा व उच्च धर्म यांच्या योगाने समाजात जी एकजूट झालेली दिसते, ती काही काळच टिकते. या दोन्ही संस्थांचे विघटन होऊ लागतेच.

टॉयन्बीच्या महाग्रंथाच्या पहिल्या सहा खंडांत केलेल्या प्रतिपादनाचा हा आढावा आहे. आता आपण पुनः टॉयन्बीच्या चरित्राकडे वळू.

(६)

आपण पाहिले की, हेन्री ल्यूस याच्या 'टाइम' या साप्ताहिकाने टायन्बीच्या इतिहास-विवेचनाला प्रसिद्धीच्या शिखरावर नेऊन ठेवले. 'टाइम'ला टॉयन्बीच्या प्रतिपादनातील कोणते मुद्दे आकर्षक वाटले? सर्वंकष राज्ययंत्रणा ही संस्कृतीच्या ऱ्हासाची निर्देशक असते. नुकतेच दुसरे महायुद्ध संपले होते. त्या महायुद्धाकडे सर्वंकष राज्ययंत्रणा स्थापण्याच्या जर्मनीच्या प्रयत्नांचा पराभव म्हणून पाहणे शक्य होते. त्या पराभवामुळे असा निष्कर्ष काढणे शक्य होते की, पाश्चिमात्त्य संस्कृतीचा ऱ्हास अजून लांब आहे. दुसरे असे की, इतिहासाची घडण केवळ भौतिक कारणातून घडत नाही. मनुष्याच्या सृजनशीलतेमुळे इतिहास घडत जातो. परिस्थितीने उभ्या केलेल्या आव्हानाला उत्तर मिळते ते मनुष्याच्या प्रतिभेतून आणि हे उत्तर अगणित प्रकारांचे असू शकते. त्यामुळे अमुक एका टप्प्यावर उभे राहून आपण ही संस्कृती आता मरणाच्या पंथाला लागली

आहे, असे म्हणू शकत नाही; पाश्चात्त्य संस्कृतीच्या बाबतीत तर नाहीच नाही. टॉयन्बीच्या विचारांचा 'टाइम'ने काढलेला गोषवारा हा असा होता. दुसऱ्या महायुद्धामुळे युरोपातील बहुतेक देश बेचिराख झाले होते. मोठ्या प्रमाणात मनुष्यहानी झाली होती. पाश्चात्त्य संस्कृती आसन्नमरण झाली आहे, असे सामान्य मनुष्याला वाटत होते. त्या आणीबाणीच्या प्रसंगी युरोपीय समाजाची लोकशाहीवर आधारलेली नवी घडी बसवणे गरजेचे होते. आजवर पश्चिमी संस्कृतीच्या परिघावर राहिलेल्या अमेरिकेने पुढाकार घ्यायला हवा होता. टॉयन्बीने केलेल्या इतिहासाच्या अभ्यासाला 'टाइम'ने दिलेली ही डूब अमेरिकेतील लोकांच्या तत्कालीन मनोवृत्तीला आकर्षक वाटली व 'आशेचा दूत' म्हणून टायन्बीचे स्वागत झाले. इथून पुढे जवळजवळ १५ वर्षे टॉयन्बीने अमेरिकेतील बौद्धिक जगतावर आपला प्रभाव गाजविला. त्याने व्याख्यानांचे दौरे काढले, चर्चापरिषदांतून भाषणे दिली. प्रसिद्धिमाध्यमांना मुलाखती दिल्या व खूप पैसा मिळविला.

टॉयन्बीचे व्यक्तिगत व कौटुंबिक जीवन मात्र फारसे सुखाचे नव्हते. १९१३ च्या सप्टेंबर महिन्यात टॉयन्बीने रॉझलिंड मरे नावाच्या स्त्रीशी लग्न केले. लग्न अर्थातच परस्परांना पसंत करून व प्रेमात पडल्यानंतर झाले. रॉझलिंड ही गिल्बर्ट मरे (१८६६-१९५७) या ग्रीक भाषेच्या विख्यात अभ्यासकाची मुलगी होती. गिल्बर्ट मरे हा ऑक्सफर्ड विद्यापीठात ग्रीक भाषेचा प्राध्यापक असून टॉयन्बीवर त्याची फार मर्जी होती रॉझलिंडवर प्रभाव होता तो (तिच्या आईची आई) 'कौण्टेस ऑफ कार्लाईल' या घरंदाज आणि जबरदस्त व्यक्तिमत्त्वाच्या आजीचा. ही आजी हेकट आणि मनस्वी स्त्री होती. त्यामुळेच तिचा नवरा तिच्यापासून निराळा राहत असे. आजी फार श्रीमंत होती व तिची मालमत्ता रॉझलिंडला मिळेल असा समज होता. (तो खरा ठरला नाही.) आपल्या आजीचा हट्टी आणि दुसऱ्यांना आपल्या कच्छपी ठेवण्याचा स्वभाव रॉझलिंडमध्ये उतरला होता. तिच्या ठिकाणी काही कौशल्येही होती. तिने तीन कादंबऱ्या लिहिल्या, पण त्यांचा खप काही झाला नाही. त्यामुळे एक कुरठेपणा तिच्या ठिकाणी आला होता. टॉयन्बीने जो महा-ग्रंथ हाती घेतला होता त्याला ती 'नॉन्सेन्स बुक' असे म्हणे. मग टॉयन्बीही खाजगीत आपल्या ग्रंथाला तेच नाव देऊ लागला. टॉयन्बी व रॉझलिंड यांचे परस्परांवर प्रेम होतेही; पण रॉझलिंडच्या स्वभावामुळे खटके उडत व अखेर टॉयन्बीला रॉझलिंडची मनधरणी करावी लागे.

या जोडप्याला तीन मुलगे झाले. मोठा मुलगा ॲण्टनी हा १९१४ सालचा. हा मुलगा काही सरळ निघाला नाही. तो अस्थिर मनोवृत्तीचा होता व १९३९ साली त्याने आत्महत्या केली! त्याच्या मृत्यूचे अतोनात दुःख टॉयन्बीला वाटत राहिले. ॲण्टनीच्या मृत्यूनंतर 'अलौकिकाचा साक्षात्कार' असे ज्याला म्हणता येईल, त्या प्रकारचा अनुभव टॉयन्बीला आला. दुसरा मुलगा फिलिप हाही सुरुवातीला वांड होता. दुसऱ्या महायुद्धात तो सैन्यात गेला व प्रत्यक्ष लढाईतही त्याने भाग घेतला. नंतर त्याने वृत्तपत्रातून पुस्तकांची परीक्षणे लिहिण्याचा उद्योग केला. तिसरा मुलगा लॉरेन्स हा आई-वडिलांचा लाडका होता. किंबहुना, मोठ्या दोघा मुलांची आई-वडिलांविरुद्ध हीच मोठी तक्रार होती. हाही दुसऱ्या महायुद्धाच्या काळात सैन्यात होता. युद्ध संपल्यावर तो चित्रकाराचा व्यवसाय करू लागला व चित्रकलेचा शिक्षक झाला. याचे वैशिष्ट्य म्हणजे याने इंग्लंडचा एके काळचा पंतप्रधान आस्कविथ याच्या नातीशी लग्न केले. टॉयन्बीला ही खंत वाटे की, दिवसा संस्थेचे काम व रात्री 'नॉन्सेन्स बुक'चे लिखाण यांत गुंतून पडल्याने आपण मुलांशी जवळीक साधू शकलो नाही. रॉझलिंड ही काहीशी आक्रस्ताळी स्त्री असल्याने पहिल्या दोन मुलांशी तिचे जुळलेच नाही व सारे प्रेम लॉरेन्सला मिळाले. टॉयन्बी व रॉझलिंड यांच्यात मुलांशी कसे वागावे यावरून अनेकदा भांडणे होत.

आपण पाहिलेच आहे की, टॉयन्बीकडे 'रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ इंटरनॅशनल अफेअर्स' (इन्स्टिट्यूट) या संस्थेसाठी आंतरराष्ट्रीय घडामोडींचा वार्षिक अहवाल तयार करण्याचे काम होते. दुसरे महायुद्ध सुरू झाल्यावर सरकारने 'फॉरेन रीसर्च ॲण्ड प्रेस सर्व्हिस' नावाचा विभाग परराष्ट्र खात्यात काढला व 'इन्स्टिट्यूट'चा सर्व नोकरवर्ग या विभागाकडे घेतला. टॉयन्बी या विभागाचा प्रमुख होता. 'इन्स्टिट्यूट'ची सर्व कागदपत्रे व कार्यालय








'बेलियल कॉलेज', ऑक्सफर्ड इथे हलविण्यात आले व तेथूनच नव्या विभागाचा कारभार चालत होता. या विभागाचे मुख्य काम असे होते की, परराष्ट्र संबंधांबाबत सरकारच्या कोणत्याही खात्याने माहिती मागविली तर या विभागाने ती पुरवायची. हे काम टॉयन्बीने उत्तम क्षमतेने पार पाडले. युद्ध संपत आल्यावर या विभागाकडे युद्धोत्तर परराष्ट्र धोरण ठरविण्यासाठी अभ्यासपूर्ण सूचना करण्याचे कामही सोपविण्यात आले.

१९३२ सालापासून रॉझलिण्डच्या धार्मिक मतात बदल होऊ लागले. मुळात ती ॲंग्लेकन चर्चची अनुयायी होती. पण आता तिला कॅथलिक पंथाविषयी आकर्षण वाटू लागले व १९३६ साली ती कॅथलिक चर्चची उपासक झाली. तिची इच्छा होती की , टॉयन्बीनेही हाच पंथ स्वीकारावा. खुद्द टॉयन्बीलाही अध्यात्माची ओढ लागली होती व कॅथलिक तत्त्वांचा अभ्यास त्याने केला होता. पण त्याने कॅथलिक चर्च स्वीकारण्याचे नाकारले. ३९ साली ॲण्टनीने आत्महत्या केल्यावर टॉयन्बी पतिपत्नीतील दुरावा वाढू लागला. पण तरीही टॉयन्बीला रॉझलिंड-विषयी जिव्हाळा वाटतच होता. त्याने रॉझलिंडला 'फॉरेन रीसर्च व प्रेस सर्व्हिस' या विभागात नोकरी दिली. पण ऑक्सफर्डसारख्या सुरक्षित ठिकाणी राहण्याचा डरपोकपणा रॉझलिंडला पसंत नव्हता. बॉंबहल्ल्यांनी उद्‌ध्वस्त होणाऱ्या लंडनमध्ये राहून बेघर लोकांना निवारा पुरविणाऱ्या संस्थेत ती काम करू लागली.

लंडनमध्ये राहू लागल्यावर रॉझलिंड रिचर्ड केहो नावाच्या एका कॅथलिक पंथाच्या विद्वान मनुष्याच्या सहवासात आली. रिचर्ड केहो हा ख्रिस्ती धर्माचा उत्तम अभ्यास केलेला लोकप्रिय प्रवचनकार होता. तो रॉझलिंडहून १५ वर्षांनी लहान होता. त्या दोघांत काही शारीरिक आकर्षण असेल असा संशय टॉयन्बीला आला नाही. ॲण्टनीचा मृत्यू झाला होता आणि फिलिप व लॉरेन्स सैन्यात होते. त्यामुळे रॉझलिंडच्या वात्सल्याने रिचर्डला लक्ष्य केले असेल, असे टॉयन्बीला वाटले. १९४२ साली रॉझलिंडच्या कोंडलेल्या भावनांचा स्फोट झाला. तिला रुग्णालयात ठेवावे लागले. टॉयन्बीविषयी तिच्या भावना शुष्क होत गेल्या व तिने ४२ च्या ऑक्टोबरमध्ये त्याच्याशी असलेले संबंध तोडून टाकले. हा धक्का सहन होण्याजोगा नव्हता. पण टॉयन्बी एकनिष्ठपणे आपले काम करीतच राहिला.

टॉयन्बी ज्या इन्स्टिट्यूटमध्ये काम करीत होता, तेथे व्हेरोनिका बौल्टर नावाची स्त्री त्याची सहकारी होती. परराष्ट्रीय घडामोडींचा वार्षिक अहवाल तयार करण्यात तिची फार मदत टॉयन्बीला होत असे. तिची टापटीप, लिखाणातील नेमकेपणा, कामाची शिस्त व मुख्य म्हणजे निष्ठा हे गुण टॉयन्बीच्या पसंतीला उतरले होते. ती स्वतः केंब्रिज विद्यापीठाची पदवीधर होती. रॉझलिंडच्या खालोखाल टॉयन्बीला बौल्टर या स्त्रीविषयीच आपुलकी वाटत असे. १९४६ साली रॉझलिण्डने टॉयन्बीपासून घटस्फोट घेतला. नंतर टॉयन्बीने बौल्टरशी विवाह केला. रॉझलिंडशी घटस्फोट झाला तरी टॉयन्बीचे गिल्बर्ट मरेशी संबंध जवळचेच राहिले. टॉयन्बीची मुले फिलिप व लॉरेन्स यांच्या कुटुंबांशीही टॉयन्बी खेळीमेळीने वागत होता. व्हेरोनिका बौल्टरशी विवाह केल्यापासून टॉयन्बीचे आयुष्य सुखासमाधानाने व शांततेने व्यतीत होऊ लागले.

टॉयन्बीच्या अमेरिकेतील प्रचंड लोकप्रियतेला १९६० सालानंतर ओहोटी लागली. त्याचे एक कारण असे होते की, आपल्या इतिहास-ग्रंथाच्या शेवटच्या चार भागांत त्याने जे विवेचन केले होते ते अमेरिकेतील तरुण पिढीला रुचणारे नव्हते. (टॉयन्बीचे विचार आपण पाहणार आहोतच.) इंग्लंडमधील पंडितही टॉयन्बीच्या इतिहासाच्या तत्त्वज्ञानावर नाखूश होते. ट्रेव्हर-रोपर हा इंग्लंडमधील प्रसिद्ध इतिहासकार होता. त्याने टॉयन्बीवर फार तिखट टीका केली होती. त्यानंतर टॉयन्बीचे महत्त्व पाश्चात्त्य विचारवंतांत व समाजातही उतरणीला लागले.

पण याच काळात जपानमध्ये टॉयन्बीच्या विचारांना फार मोठे अनुयायी मिळू लागले होते. टॉयन्बीने जपानला तीनदा भेट दिली. जपानमध्ये भांडवलशाहीने जबरदस्त उंची गाठली होती. या भांडवलदारांना साम्यवादाची धास्ती वाटत होती. त्यांनी साम्यवादविरोधी व्यासपीठ निर्माण व्हावे म्हणून 'टॉयन्बी सोसायटी' नावाची संस्था काढली. या संस्थेने टॉयन्बीचे बहुतेक ग्रंथ जपानी भाषेत रूपांतरित करून प्रसिद्ध केले. ही संस्था म्हणजे जपानमधील उच्चभ्रू उद्योगपती, सरकारी नोकर, कार्यकर्ते यांच्या

प्रबोधनाचा वर्गच झाला होता. इथे (साम्यवादी वगळून इतर) सर्व विचारप्रणालींचे अभ्यासक संस्थेच्या सभासदांशी चर्चा करण्यास येत. १९७० साली 'माइनिची शिंबून' या वृत्तपत्राने तीन महिन्यांहून जास्त काळ एक सदर चालविले. या सदरातून टॉयन्बी 'सुखी जीवन कसे जगावे?' या विषयावरील प्रश्नांना उत्तरे देत असे.

ग्रीक स्थापत्यशास्त्रज्ञ (आर्किटेक्ट) कॉन्स्टन्टाईन डोक्शियाडिस याच्याशी १९६२ साली टॉयन्बीची मैत्री झाली. डोक्शियाडिसने कराचीमध्ये नवीन प्रकारच्या स्वयंपूर्ण वसत्या निर्वासितांसाठी बांधल्या होत्या. त्या पाहून टॉयन्बी फारच प्रभावित झाला. टॉयन्बीची खात्री होती की, भविष्यात बहुतेक मनुष्यवस्ती ही शहरात राहील व अतिविस्तृत असे वसती-पुंज तयार करावे लागतील. टॉयन्बीचे हे विचार कळून डोक्शियाडिसला फार आनंद झाला. दोघांनी 'नागरीकरणाची संस्था' म्हणून एक संस्था काढली. जुन्या ग्रीक शहरांची माहिती देणारे एक पुस्तक टॉयन्बीने तयार केले. डोक्शियाडिस नागरीकरणाच्या समस्यांवर विचार करण्यासाठी वारंवार जागतिक परिषदा भरवीत असे. त्यांतही टॉयन्बीचा महत्त्वपूर्ण सहभाग असे.

टॉयन्बी आयुष्याच्या शेवटापर्यंत निरनिराळ्या बौद्धिक उपक्रमांत भाग घेत होता. जवळजवळ शेवटच्या वर्षी त्याने रॉझलिंडला तिच्या आजीकडून मिळालेल्या 'गॅनथॉर्प' नावाच्या गढीच्या आवारात एक घर बांधले व तिथे तो व व्हेरोनिका राहायला गेले. 'विंचेस्टर विद्यालय' या त्याच्या शाळेने त्याच्यासाठी एक स्वागत समारंभ २९ जून १९७४ रोजी योजला. तिथे त्याने गौरव-समारंभाला उत्तर देताना लॅटिनमध्ये भाषण केले. या समारंभात त्याने मोठ्या हुरूपाने भाग घेतला. त्यानंतर महिन्याभरातच त्याला अर्धांगाचा झटका आला व एका रुग्णालयात त्याला ठेवावे लागले. व्हेरोनिकाने त्याची निष्ठेने शुश्रूषा केली. २२ ऑक्टोबर १९७५ या दिवशी टॉयन्बी निधन पावला. तो तेव्हा ८६ वर्षांचा होता.

(७)

आपण पाहिले की, टॉयन्बीने 'ए स्टडी ऑफ हिस्टरी' या त्याच्या पुस्तकाच्या पहिल्या सहा खंडांचे लिखाण १९३९ साली संपवले व पुढच्या चार खंडांचे लिखाण दुसरे महायुद्ध संपल्यावर सुरू केले. दुसऱ्या महायुद्धात झालेला अनर्थ, ॲटमबॉम्बने चुटकीसरशी केलेला दोन शहरांचा विध्वंस, काही आणीबाणीच्या क्षणी टॉयन्बीला स्वतःला आलेले अलौकिकाच्या साक्षात्काराचे अनुभव, महायुद्धानंतर झालेल्या शांतता-परिषदेनंतर वाढत गेलेला पाश्चिमात्य देश व राशिया यांच्यातील तणाव या सर्वांचा परिणाम म्हणून पुढच्या चार खंडांतील विवेचन पहिल्या सहा खंडांतील प्रतिपादनापेक्षा निराळे झाले. इतिहासाचे विश्लेषण करतानाच टॉयन्बी वर्तमानात उतरला आणि भविष्याविषयी अंदाज वर्तवू लागला.

सहाव्या खंडाच्या अखेरीला टॉयन्बीने सांगितले होते की, विघटनाच्या सीमेवर घुटमळणाऱ्या समाजातील धुरंधर वर्ग एका सर्वंकष राज्ययंत्रणेची बांधणी करतो, तर अवांतर समाज उच्च धर्माचा स्वीकार करतो. सर्वंकष राज्ययंत्रणेपासून समाजाला खूपच फायदे होतात यात शंका नाही. दळणवळण, भाषा व वाङ्मय, कायदा व सुव्यवस्था, लष्कर, नोकरशाही इत्यादी स्थिर-राजवटीची अंगे लोकांच्या सुखसोयी वाढवतात. त्यामुळे धुरंधर समाजाने जरी ही व्यवस्था अवांतर समाजावर लादलेली असली, तरी त्या समाजाला ती स्वीकारावीशी वाटते. ही सर्वंकष राज्ययंत्रणा अवांतर समाज ज्या उच्च धर्माचा प्रसार व्हावा यासाठी प्रयत्नशील असतो, त्या प्रसाराला उपकारक ठरते. हे सर्व रोमन साम्राज्याच्या काळात ख्रिस्ती धर्माचा जो विस्तार झाला तेव्हा अनुभवास आले होते. हिंदुस्थानावरील ब्रिटिश राज्य हे परक्यांनी लादलेले होते, तरी हिंदी जनतेने ५०-६० वर्षे त्याचा सुखाने स्वीकार केलाच होता. ब्रिटिश राज्याच्या काळातच हिंदू धर्माचे नव्याने परिष्करण सुरू झाले. टॉयन्बी सांगतो की, हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळाले याचा अर्थ इतकाच की, ब्रिटिशांच्या सर्वंकष राजवटीचे हिंदी उच्चवर्गाने हिंदीकरण (इंडियनायझेशन) केले. ते करताना पाकिस्तान मात्र त्यांच्या हातून निसटले.

अवांतर समाज उच्च धर्माचा स्वीकार करतो याचा अर्थ आपले स्थानिक उपासनापंथ आणि देवता यांचे समाजाला वाटणाऱ्या व जो एकच देव मानतो अशा धर्मात विसर्जन करतो. हे सर्व होण्यास अनेक शतके जावी लागातात. ख्रिश्चन धर्म युरोपातील निरनिराळ्या

जमातींपर्यंत पोचला तेव्हा त्या त्या जमातींचे उपासनामार्ग बराच काळ चालूच राहिले; पण त्या जमातींनी ख्रिस्ती धर्माचे मुख्य तत्त्व की, ईश्वर एकच आहे व येशू त्याचा दूत आहे, हे स्वीकारले. हिंदू धर्मांचा प्रसारही असाच झाला. शैव, वैष्णव इत्यादी पंथ चालतच राहिले; परंतु त्यांनी एकच सर्वव्यापी व सर्वसाक्षी ईश्वर आहे, हे तत्त्व स्वीकारले. टॉयन्बीचे मत असे आहे की, संस्कृतीच्या विघटनाच्या काळात या उच्च धर्मांचा उपयोग जुन्या संस्कृतींच्या तुकड्यांना नवीन संस्कृतीच्या रूपाने पुनर्जन्म मिळण्यासाठी एखाद्या कोषासारखा होतो. किडा कोषात शिरतो व फूलपाखरू होऊन बाहेर पडतो, तोच प्रकार इथे होतो आणि अपत्यसंस्कृती व मातासंस्कृती यांच्यातील दुवा म्हणून धर्म कार्य करतो. ग्रीको-रोमन संस्कृतींच्या विघटनेच्या काळात ख्रिश्चन धर्म स्वीकारला गेला. संस्कृतीचे विघटन होऊन ऑर्थोडॉक्स ख्रिश्चन संस्कृती व पाश्चिमात्य संस्कृती यांची घडण झाली. ज्याप्रमाणे सर्वंकष राज्ययंत्रणा कोसळत्या संस्कृतीला एकत्र ठेवण्यासाठी निर्माण होते पण ती संस्कृतीचा ऱ्हास थांबवू शकत नाही, त्याचप्रमाणे उच्च धर्मही संस्कृतीला एकत्र ठेवण्यासाठी येतो, पण विघटन टाळू शकत नाही. मात्र तो नव्या संस्कृतीला ऱ्हास पावलेल्या संस्कृतीशी जोडण्याचे काम करतो.

तथापि, आपल्या ग्रंथाच्या शेवटच्या हप्त्यातील विवेचनात टॉयन्बीने आपला विचार उलटा फिरवला. तो असे म्हणू लागला की, अधिक उच्च दर्जाच्या संस्कृतींच्या सर्जनाला धर्मांची जोड मिळते असे नसून उच्च दर्जाचा धर्म निर्माण होण्यासाठी जुनी संस्कृती खर्ची पडते! आपण पाहिले की, मिनोअन संस्कृतीपासून ग्रीक-रोमन संस्कृती निर्माण झाली. या दुसऱ्या पिढीच्या संस्कृतीतून पाश्चात्त्य संस्कृती (आणि ऑर्थोडॉक्स ख्रिश्चन संस्कृती) ही तिसऱ्या पिढीची संस्कृती निर्माण झाली. आता आपण असे का म्हणू नये की, दुसऱ्या पिढीतील (पक्षी : ग्रीको-रोमन) संस्कृती ही स्वतःचे काही कर्तृत्व दाखविण्यासाठी किंवा स्वतःशी साम्य दाखविणारी तिसऱ्या पिढीतील (पक्षी : पाश्चिमात्य) संस्कृती जन्माला घालण्यासाठी आपली भूमिका वठवून राहिली असे नसून, तिचे मुख्य कार्य एखाद्या उच्च (पक्षी : ख्रिस्ती) धर्मांचे उद्घाटन करून स्वतःचे विघटन करून घ्यावे हेच होते? प्रत्येक संस्कृती ही जन्म, विकास, क्षीण (किंवा खिळखिळे) होणे आणि विघटन या चक्रातून जाते. पण प्रत्येक चक्राचा फेरा हा धर्मांच्या रथाला अधिक पूर्णत्वाकडे घेऊन जातो. हीच गोष्ट इस्लाम, हिंदू, महायान बौद्ध या इतर उच्च धर्मांनाही लावून दाखविता येईल. टॉयन्बीचे हेच विवेचन युरोपातील व अमेरिकेतील विद्वानांना पसंत पडले नाही. पाश्चिमात्य संस्कृती ही मुळात ख्रिस्ती धर्मांच्या साहाय्याने जन्मली, तरी गेल्या दोन हजार वर्षांत तिचा प्रवास धर्मनिरपेक्षतेकडे चाललेला आहे. किंबहुना, धर्मनिरपेक्षतेमुळेच आपला ऐहिक उत्कर्ष झाला, असा त्या संस्कृतीचा विश्वास आहे. साहजिकच संस्कृती हे धर्मांचे वाहन आहे, हा विचार पाश्चात्त्य पंडितांना रुचला नाही.

आपला ग्रंथ लिहिण्यास सुरुवात करताना टॉयन्बीचा असा आग्रह होता की, पाश्चिमात्य जगताला मध्यवर्ती धरून आजवरचे इतिहास लिहिले गेले आहेत व तो रिवाज मला मोडावयाचा आहे. सर्व संस्कृती या तात्त्विक दृष्टीने सारख्याच आहेत. त्यामुळे पाश्चात्त्य संस्कृतीला विशेष महत्त्व देण्याचे कारण नाही. तथापि, शेवटच्या भागात टॉयन्बीने पाश्चात्त्य संस्कृतीवर निराळे प्रकरण लिहिले आहे. त्याची कारणे अशी दिली आहेत : सध्या अस्तित्वात असलेल्या सात संस्कृतींपैकी फक्त पाश्चात्त्य संस्कृतीच धडधाकट असून बाकीच्या संस्कृती खिळखिळ्या झालेल्या आहेत. दुसरे असे की पाश्चात्त्य संस्कृतीच्या छायेखाली बाकीच्या सर्व संस्कृती आल्या असून जगातील प्राथमिक अवस्थेत असणाऱ्या जमातींपर्यंत ही संस्कृती पोचली आहे. सर्वांत महत्त्वाचे असे की, सर्व मनुष्यजातीचे भविष्य पाश्चात्त्यांच्या हातात आहे. (हे टॉयन्बी १९५० च्या सुमारास लिहीत आहे. त्या वेळी ॲटमबाँबचे तंत्रज्ञान फक्त इंग्लंड व अमेरिकेकडे होते.)

पाश्चिमात्य संस्कृतीने निसर्गावर जो कब्जा मिळवलेला आहे आणि पाश्चात्त्य समाजात होणाऱ्या बदलांची जी अफाट गती आहे, त्यांची तुलना इतर कोणत्याच संस्कृतीच्या तत्सम अंगांशी करता यावयाची नाही. तंत्रज्ञानाच्या साहाय्याने मनुष्याला बहुतेक सर्व










गरजांपासून मुक्ती मिळू शकेल, इथपर्यंत प्रगती झालेली आहे. पण ही शक्यता प्रत्यक्षात आणण्यासाठी त्याची किंमत चुकवावी लागेल. आधुनिक तंत्रज्ञानाचा वापर करावयाचा तर श्रमविभाग अमलात आणावा लागतो व श्रमविभागामध्ये प्रत्येक मनुष्याला एक प्रकारच्या नीरस कवायतीसारखे काम करावे लागते. मनुष्य आपल्यावरील ही बंधने स्वीकारायला सहज तयार होत नाही. त्यातूनच समाजात अस्वस्थता निर्माण होते. व्यक्तिस्वातंत्र्य व सामाजिक न्याय या दोन्ही गोष्टी समाजस्वास्थ्यासाठी आवश्यक असतात. पण या दोन्हींत संघर्ष होण्याची शक्यताही पुष्कळ असते. उदा., आपण प्रत्येकाला पाहिजे तितकी अपत्ये जन्माला घालण्याचे स्वातंत्र्य दिले तर समाजाचे आर्थिक बळ सर्वांना सामाजिक न्याय द्यायला पुरे पडेल का? पाश्चात्त्य संस्कृतीपुढील ही आव्हाने आहेत. बरे, समजा ह्या सर्व समस्यांची उत्तरे सापडली, तरी त्यानंतर 'सारी सुखाने नांदो लागली' अशी स्थिती अवतरणार का?

(८)

एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीला रांके (१७९५--१८८६) या इतिहासकाराने साधार व तपशीलवार इतिहास लिहिण्याचे शास्त्र निर्माण केले. याच शतकाच्या मध्याला राष्ट्र ही संकल्पना प्रगल्भ अवस्थेला पोचली. राष्ट्रांच्या इतिहासातील विशिष्ट कालखंडांच्या, संस्थांच्या किंवा महत्त्वाच्या घटनांच्या हकिकती 'नामूले लिख्यते किंचित्' या नियमाचे पालन करून लिहिल्या जाऊ लागल्या. राष्ट्रवादाचा प्रभाव युरोपात पसरला व तेथून तो युरोपीय राष्ट्रांच्या साम्राज्यांतूनही फैलावला. त्यामुळे इतिहासाचे संशोधन व कथन लोकप्रिय झाले.

परंतु, या प्रवाहाला विरोधी असा विचारही, विशेषत: मार्क्सच्या (१८१८-१८८३) लिखाणातून, लगोलग पुढे आला. राष्ट्र ही कृत्रिम संकल्पना आहे. मनुष्यजात ही राष्ट्र, धर्म, वंश इत्यादी कल्पनांच्या पलीकडे आहे. मनुष्यजातीच्या इतिहासाला सूत्र आहे व त्या सूत्राच्या आधारे मनुष्याची वाटचाल उलगडता येते, असा हा विचार होता. विसाव्या शतकाच्या सुरुवातीला एच्. जी. वेल्स (१८६६-१९४६) याने 'औटलाइन हिस्टरी ऑफ द वर्ल्ड' नावाचा इतिहास लिहिला (१९२०). मनुष्यजातीची सतत प्रगती होत आहे, असे दाखविण्याचा हा प्रयत्न होता. श्पेंग्लर (१८८०-१९३६) याने 'डिक्लाइन ऑफ द वेस्ट' (१९१८-२२) हा ग्रंथ लिहून पाश्चिमात्य संस्कृती ही इतिहासाचा नायक म्हणून घेतली. पण टॉयन्बीचा ग्रंथ हा या परंपरेतील (बहुधा) अखेरचा व व्यापक स्वरूपाचा इतिहास म्हणावा लागेल.

हल्लीच्या काळात अशा व्यापक इतिहासाला इतिहासकार महत्त्व देत नाहीत. एका बृहत्कथेत मनुष्यजातीचा इतिहास कोंबताना फार ओढाताण करावी लागते व त्यामुळे खरी हकिकत विलोपून जाते, असे म्हटले जाते. टॉयन्बीच्या ग्रंथावरही तपशिलातील चुकांबद्दल बरीच टीका करण्यात आली. पण आहे ते टिकत नाही. पोषाखात नव्या चूषी येतात तशा विद्वतेच्या क्षेत्रातही नवीन चाली येतात किंवा जुनेच परिपाठ नवे म्हणून पुढे येतात. तसे इथेही होईल.

---


१. आर्नोल्ड टॉयन्बी : ए लाइफ : विल्यम एच. मॅक्नील. ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, १९८९.

२. ए स्टडी ऑफ हिस्टरी : ॲब्रिजमेंट : डी. सी. सॉमरव्हेल, ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, १९६०.


ൾൾൾ








## वाचकांचा पत्रव्यवहार

चंद्रशेखर बर्वे
बी-४, रामबाग,
पुणे - ३०.
दिनांक : ४/२/२०१४

स. न. वि. वि.

जानेवारी २०१४ च्या अंकातील 'इतिहास आणि लोकसंस्कृती' हा लेख उद्बोधक आहे. डॉ. भोसले यांची भूमिका निर्मळ व प्रांजळ आहे, त्यामुळे लेख कोणतंही आव्हान देत नाही, आवाहन करतो – विचारप्रवृत्त करतो.

लेखाची मांडणी तर्कशुद्ध व शास्त्रपूत असली तरी तो रूक्ष झालेला नाही; उलट, त्यातील सोदाहरण विवेचनामुळे त्याची रोचकता वाढली आहे. मुळात भाषणावर आधारित असल्याचाही हा सुखद परिणाम असेल ! विविध उदाहरणांमुळे विषयाचं मर्म नेमकं विशद झालेलं दिसतं. आणखी एक महत्त्वाचं – इतिहास व लोकसंस्कृती यांमधील अनुबंधाप्रमाणेच जातिजातींतील सादर संबंधांवरही लख्ख प्रकाश पडलेला असल्यामुळे, त्यांकडे स्वच्छ नजरेनं बघण्याची प्रेरणाही मिळू शकेल.

संशोधनाच्या अंगानं जाऊन सामाजिक गढूळपणा कमी करायला मदत करू शकणारा लेख लिहिल्याबद्दल श्री. द. ता. भोसले यांचं अभिनंदन करायला हवं.

असे लेख छापून 'नवभारत' सांस्कृतिक अभिसरण निकोप ठेवतो आहे, म्हणून संपादकांना धन्यवाद.

– चंद्रशेखर बर्वे

